# तोतया नाटककार

( स्वतंत्र सामाजिक विनोदी नाटक )

लेखकः—ना. सी. फडके

फेब्रुआरी: १९३८



किंमत १२ आणे.

प्रकाशक : स्कूल अँड कॉलेज बुकस्टॉल,
कोल्हापूर.





२ "Phadke's Players" या नाट्यमंडळानें या नाटकाचा पहिला प्रयोग कोल्हापूर येथील पॅलेस थिएटरमध्यें ता. १५-१२-३६ रोजीं केला.



मुद्रक : कृ. ह. सहस्रबुद्धे,
श्रीज्ञानेश्वर प्रेस, कोल्हापूर.

# तोतया नाटककार

## अंक १ ला

[ एका बंगल्याचा दिवाणखाना. पडदा वर जातो त्यावेळेस स्टेजवर कोणीच नसतें. बाहेरून कुणी तरी कॉलबेल वाजवतें तेवढी ऐकूं येते. तिला बंगल्यांतून कोणीच उत्तर देत नाहीं; त्यामुळें घंटा पुन्हां दोन-तीनदां जोरजोराने वाजविली जाते. त्यानंतर मात्र आंतून सोन्या सैंपाकी धांवत धांवत येतो. ]

**सोन्या०**—( प्रवेश करून ) आलों आलों ! ( घाईनें दाराकडे जातांना मधल्या टेबलाला त्याचा पाय लागून टेबलावरचें सामान खालीं पडतें. ) घाईत घाई अन् विंचू चावला ग बाई ! हे अलीकडचे फॅशनेबल गौरी-सारखे सजवलेले दिवाणखाने अस्सा घोंटाळा करतात. यातनं वावरायचं म्हणजे अंग चोरून जपूनच वावरायला पाहिजे. ( सामान उचलून ठेवूं लागतो. पुनः जोरजोरानें घंटा वाजूं लागते. ) या बाब्याचा तर प्राण चाललाय ! आलों आलों !! (दारापर्यंत जातो व दार उघडतो.) कोण आहे ?

( एक सूटबूट घातलेला, चष्मा लावलेला बावळट गृहस्थ आंत येतो. )

**सोन्या०**—अहो साहेब, हलकें हलकें ! मला शिवाल. मी सोंवळ्यांत आहें.

**गृहस्थ०**—सोंवळ्यांत ? अन् दिवाणखान्यांतल्या या बैठकीवर आलांत ते ?

**सोन्या०**—अहो ! अलीकडे सोंवळ्याला तेवढं चालतं.

**गृहस्थ०**—हो हो ! तेंही खरंच. अलीकडचं सोंवळं दिवाणखान्या-पर्यंत येऊन पोंचलं आहे हें मी विसरलोंच. बरं, सुप्रसिद्ध नाटककार धीरेंद्र सारस्वते इथेंच राहतात का ?

**सोन्या०**—हो.

**गृहस्थ०**—आहेत का घरांत ?

**सोन्या०**—नाहींत; फिरायला गेले आहेत.

**गृहस्थ०**—रोज जातात वाटतं ?

**सोन्या०**—हो, अगदीं नेमानं.

**गृहस्थ०**—छान. थांबा हं, मला नोंद करून ठेवूं द्या. ( खिशांतून नोटबुक व पेन्सिल काढून लिहूं लागतो. लिहितां लिहितां स्वगत ) रोज नियमानें फिरावयास जातात—

**सोन्या०**—म्हणजे ? हें हो काय ? मी बोलेन तें टिपून कसलं घेतां ? तुम्ही कोणी पोलीस बिलीस आहांत कीं काय ? हें कुठलं नसतं लचांड मीं आंत घेतलं ?

**गृहस्थ०**—अहो, घाबरूं नका. मी पोलिसांतला नाहीं हो—

**सोन्या०**—मग ?

**गृहस्थ०**—'दुष्काळ' नांवाचं वर्तमानपत्र तुम्हांला माहीतच असेल ?

**सोन्या०**—वा ! तर. चुलीपाशीं हातीं धरायला कागद म्हणून 'दुष्काळ'चेच अंक वापरतों ना आम्ही !

**गृहस्थ०**—अहाहा ! तुमच्या या बोलण्यानं किती आनंद झाला म्हणून सांगूं ? अहो, महाराष्ट्रांतल्या प्रत्येक कुटुंबांत अगदीं चुलीपर्यंत आमचं वर्तमानपत्र पोंचावं अशी महत्त्वाकांक्षा आहे आमची.

**सोन्या०**—'दुष्काळ' अगदीं घरोघर चुलीपर्यंत पोंचलाय; त्याची नका काळजी करूं ! मला फार आवडतं तुमचं वर्तमानपत्र बघा. परवां तुम्हीं आपल्या 'साप्ताहिकांत' पुण्याच्या सुप्रसिद्ध नथोबा आचाऱ्याची मुलाखत लिहिली होती ना, ती आपल्याला फार आवडली बुवा. त्या अंकांतच आतांशीं मी आपल्या गांजाची पुरचुंडी करून ठेवली आहे. वा रे 'दुष्काळ !'

**गृहस्थ०**—( अभिमानानें ) '**दुष्काळ**'**चा तिसरा सहसंपादक आहे मी. मघाशीं काय म्हणालांत ? नाटककार धीरेंद्र नेमानं फिरायला जातात—हं ? सकाळ संध्याकाळ दोन्ही वेळां का ?**

**सोन्या०**–नाहीं, फक्त सकाळीं.

**गृहस्थ०**–( नोटबुकांत टिपण करीत ) फक्त सकाळीं. संध्याकाळीं फिरायला जाणें त्यांना बिलकूल आवडत नाहीं.

**सोन्या०**–अहो, हें काय ? हें मीं कधीं सांगितलं तुम्हांला ?

**गृहस्थ०**–अहो, सांगायला कशाला पाहिजे? तर्कानं आलंच कीं तें ! अहो, मोठ्या लोकांच्या मुलाखती लिहायच्या म्हणजे त्याचं तंत्र असं आहे, कीं सांगितलेल्या गोष्टी दहा, तर तर्कानं घुसडून घातलेल्या गोष्टी नव्वद !

**सोन्या०**–शाब्बास ! तुमच्या मुलाखती म्हणजे गवळ्याचं दूधच म्हणा ना ? एक टक्का म्हशीनं दिलेलं दूध अन् नऊ टक्के त्यांत घातलेलं पाणी !

**गृहस्थ०**–तें चालायचंच हो. बरं आणखी असं सांगा, नाटककार धीरेंद्र इथं लोणावळ्यास येऊन राहिले आहेत ते कशासाठीं ?

**सोन्या०**–कशासाठीं म्हणजे ? पोटासाठीं !

**गृहस्थ०**–छट् ! कांहीं तरी सांगतां. मुंबईस काय त्यांना पोटाला मिळत नव्हतं ?

**सोन्या०**–तसं नाहीं हो. पोटासाठीं म्हणजे त्यांना पोटांतला कांहीं विकार झाला आहे त्याच्यासाठीं !

**गृहस्थ०**–( टिपून घेत ) पोटांतला कांहीं विकार झाला आहे. बरं, काय हो, असं सांगा, नाटककार धीरेंद्र यांचा इथें लोणावळ्यास किती दिवस मुक्काम व्हायचा आहे ?

**सोन्या०**–दोन चार दिवसांतच हलणार होते इथनं. पण पद्मा नांवाची कुणी मुलगी इथं राह्यला यायची आहे वाटतं, म्हणून—

**गृहस्थ०**–ओ हो, काय सुंदर बातमी सांगितलीत हो ! मुलाखतींत सुंदर मुलगीही घालतां आल्यावर आणखी काय पाहिजे? काय नांव म्हणालांत ? पद्मा नाहीं काय? वाः ! सुंदर ! ( टिपून घेत ) पद्मा नांवाच्या एका अत्यंत लावण्यसंपन्न मुलीवर धीरेंद्र यांचें सध्यां प्रेम–

**सोन्या०**—अहो मिस्टर, हें तुम्हीं चालवलं आहे काय ? प्रेमाचा एक शब्द तरी काढला का मीं तोंडावाटें ?

**गृहस्थ०**—अहो, ह्या गोष्टी सांगायला कशाला पाहिजेत ? आमच्या मेंदूंत तर्क नांवाचा जो पदार्थ—पदार्थ नव्हे युक्ति, शक्ति—

**सोन्या०**—चुलींत घाला तुमची शक्ति ! अरेच्या, चुलीवरच्या अधणाकडे मला पाह्यला पाहिजे. मी जातों. तुम्हीं बसा इथें. मालक आत्तां येतील. ( तितक्यांत बाहेर धीरेंद्र माळ्याला ओरडून कांहीं तरी सांगत असल्याचा आवाज ऐकूं येतो. ) अरे बापरे, आलेच वाटतं. अहो, मीं तुम्हांला कांहीं सांगितलं असं त्यांना जर सांगितलंत तर माझी कणीकच तिंबतील बरं कां !

**गृहस्थ०**—अहो, हें सांगायला कशाला पाहिजे ?

( धीरेंद्र प्रवेश करतो )

**धीरद्र०**—[ प्रवेश करीत ] काय रे सोन्या, टपाल आलं आहे का ?

**सोन्या०**—हो, आलं आहे. तिथें टेबलावर ठेवलं आहे. आणखी हेही कोणसे आले आहेत. ‘ दुष्काळां ’तले—काय म्हणालांत हो ? तिसरे का चौथे विसरलों.

**धीरेंद्र०**—‘ दुष्काळां ’तले ? आमच्याकडे आले आहेत ? काय हो, हें अन्नछत्र आहे असं चूकून समजलांत कीं काय ?

**सोन्या०**—( आंत निघून जातां जातां त्या गृहस्थाच्या कानांत ) आतां घ्या बुवा तुमचं तुम्ही पाहून. ( जातो. )

**गृहस्थ०**—[ खिशांतलें कार्ड पुढें करीत ] मी ‘ दुष्काळ ’ चा तिसरा सहसंपादक.

**धीरेंद्र०**—तिसरा ? म्हणजे तुमच्या आधींचे दोन आटपले कीं काय ?

**गृहस्थ०**—हंः हंः, आपण नाटककार आहांत, काय विनोद कराल तो खरा.

**धीरेंद्र०**—बरं, काय ? आपलं काय काम आहे ?

गृहस्थ०–आपली मुलाखत मिळाली तर हवी आहे.

धीरेंद्र०–मुलाखत ? मीं आतांपर्यंत दोन निश्चय कटाक्षानं पाळले आहेत. एक फोटो कधीं काढूं द्यायचा नाहीं, अन् दुसरा मुलाखत कधीं द्यायची नाहीं! वाटलं तर एक सोडून चार कप चहा देतों, पण मुलाखतीचं नांव नका काढूं. माझा नियम आहे, त्याला इलाज नाही !

गृहस्थ०–हां, पण नियमाला अपवाद असतोच कीं!

धीरेंद्र०–हें पहा, या गोष्टी मला नका शिकवूं. तुम्हांला एकदां सांगितलं ना मी मुलाखत देणार नाहीं म्हणून ?

गृहस्थ०–फार मोठी नको. छोटी, एक कॉलमभर.

धीरेंद्र०–आतां काय करावं ? आपण संपादक आहांत कां विमा कंपनीचे एजंट आहांत असा चिकटपणा करायला ?

गृहस्थ०–वाः ! आपणच गोष्ट काढलीत, फार छान झालं. विमा एजंटाचाही धंदा मी साइडबिझिनेस म्हणून करीत असतों. हें पहा आमच्या 'अमर' कंपनीचं प्रॉस्पेक्टस. ( खिशांतून पत्रक काढून पुढें करतो. )

धीरेंद्र०–महाराज, आतां आपण जातां कीं नाहीं ? मुलाखत देण्यासारखे माझ्याजवळ कांहीं विचारही नाहींत, आणि विमा उतरण्याजोगी अपमृत्यूची भीतीही मला वाटत नाहीं. आणखी चाळीस पन्नास वर्षें तरी मी जगेन असा माझा विश्वास आहे.

गृहस्थ०–वाः वाः! छान ! (नोटबुकांत टिपण करीत) आणखी चाळीस पन्नास वर्षें तरी जगण्याचा धीरेंद्रांना जबर आत्मविश्वास आहे.

धीरेंद्र०–काय हो, हें टिपून काय घेतां ?

गृहस्थ०–द्दे छे, मोठीं माणसं जें बोलतील तें टिपून घ्यायची आपली संवय आहे झालं !

धीरेंद्र०–आतां मात्र तुम्हांला धक्के मारून—

**गृहस्थ०**—छे, छे, ती तसदी कशाला घेतां ? चाललोंच—बरं आहे, येऊं ? नमस्कार.

**धीरेंद्र०**—हां हां, या बरं !

**गृहस्थ०**—बरं आहे. कधीं पुण्यास आलांत तर 'दुष्काळां'त या.

**धीरेंद्र०**—हो, हो. दुष्काळ पडल्यावर अवश्य येईन बरं !

**गृहस्थ०**—( जातां जातां एकीकडे ) कॉलमभर मुलाखत खरडायला रगड झाली कीं माहिती मिळाली तेवढी ! ( जातो. )

[ धीरेंद्र 'गेली एकदांची ब्याद' असा अभिनय करून टेबलाजवळ जातो व पत्रें पाहूं लागतो. पहिल्या पत्राकडे पहात–]

**धीरेंद्र०**—वा: ! Good luck ! ज्या पत्राची वाट पहातोय दोन दिवस तें आलंच कीं ! From:— Dr K. K. Gune, Bombay ! Fine! काय म्हणतात डॉक्टरसाहेब ? आमच्या म्हणण्याला मान्यता देतात कीं नाहीं ? पाहूं या. (पत्र उघडून वाचूं लागतो.) "सा. न. वि. वि. माझ्या पहिल्या पत्राला आपल्याकडून तत्परतेनें उत्तर आलेलें पाहून संतोष झाला. आपल्यासारख्या रसिक नाटककारास माझी लग्नाची मुलगी पद्मा हिचा फोटो मी मागील पत्राबरोबर धाडला तो कांहींसा भीत भीतच धाडला. त्यामुळें फोटो तरी पसंत आहे असें आपण लिहिलें तें वाचून फार आनंद झाला. पद्माचा व आपला प्रत्यक्ष परिचय होऊन दोघांनीं एकमेकांस पसंत केलें पाहिजे हें जें आपण लिहितां तें योग्यच आहे. आतां काळच तसा आला आहे हें आम्हीं जुन्या मंडळीनीं ओळखलें पाहिजे. तेव्हां आपल्या सूचनेप्रमाणें पद्माताईस घेऊन आपल्याकडे दोन दिवस रहावयास लोणवळ्यास येईन म्हणतों—" ( पत्र पुढें न वाचतां ) O, Grand ! आपल्या छोकरीला घेऊन डॉक्टरसाहेब येतात म्हणायचे ! त्यांच्या स्वागताची अन् आदरातिथ्याची चोख व्यवस्था ठेवली पाहिजे मला आतां. सोन्या ! ए सोन्या ! ( सोन्या आंतून धांवत येतो. ) अरे, पाहुणे मंडळी येणार आहेत. फार बडी पाहुणे मंडळी यायची आहेत.

**सोन्या०**—माहीत आहे. त्या पद्माताई कां कोण त्या, अन् त्यांचे वडील ना ?

**धीरेंद्र०**—मूर्खा, तुला रे काय माहीत ? माझीं पत्रं फोडून वाचून पुनः बंद करून ठेवीत असतोस कीं काय ? हो, असंच असलं पाहिजे. त्याशिवाय ही गुप्त बातमी तुला कशी रे समजली ? छे छे, असे गैर-विश्वासू नोकर मला मुळींच ठेवतां कामा नये. आज माझीं पत्रं फोडतो आहेस, उद्यां माझ्या नाटकाचे प्लॉट फोडशील अन् नाटकाच्या धंद्यांत चांचेगिरी करणाऱ्या फालतू नाटककारांना स्वस्त दरांत विकशीलसुद्धां ! बोल, माझं हें पत्र फोडून वाचलंस ना ?

**सोन्या०**—पण मालक, माझं जरा ऐकाल कां ? काल तुम्हीच तुमचे स्नेही रत्नकांत यांच्याजवळ मुंबईचे डॉ० गुणे अन् त्यांची मुलगी पद्मा यांना तुम्हीं लोणावळ्यास रहायला कां बोलावलं आहे अन् कसं बोला-वलं तें सगळं सांगत होतां ना ? जेवायच्या वेळेस सैंपाकघरांत माझ्यासमोर विषय चालला होता तो मीं ऐकला, हा काय माझा अपराध ?

**धीरेंद्र०**—अलबत् अपराध ! यांत काय शंका आहे ? अरे, नोकर-माणसांनीं आपले कान आणखी डोळे बंद ठेवून नोकरी करायची असते. साहेब लोकांचे नोकर कसे असतात माहीत नाहीं तुला ? त्यांचे मालक नेहमीं नव्या नव्या मैत्रिणी घरीं आणून चैन करीत असतात. पण त्यांच्या नोकरांना कांहीं दिसत नाहीं कीं कांहीं ऐकू येत नाहीं !

**सोन्या०**—मालक, संवय झाली कीं आम्हींसुद्धां तसं वागूं कीं.

**धीरेंद्र०**—ठीक, ठीक. आशेला थोडी तरी जागा आहे म्हणायची ! बरं, मग काय समजलास ? फार महत्त्वाचे पाहुणे यायचे आहेत. महत्त्वाचे कां म्हणतों तें माहीतच आहे तुला आतां. तेव्हां त्यांची बरदास्त अगदीं उत्कृष्ट ठेवली पाहिजे.

**सोन्या०**—त्याची अगदीं चिंता करूं नका. माळ्याला सांगून खोल्या उत्तम थाटून ठेवतों. दुपारीं बाजारांत जाऊन मटार, फ्लॉवर, कोबी, अशा निवडक निवडक भाज्या पंधरा वीस शेर घेऊन येतों. शिवाय केळ्यांचे चार पांच घड, चार पांच डझन मुसंबी, दहा बारा शेर द्राक्षं—

**धीरेंद्र०**—मूर्खा ! आपल्या या बंगल्यांत पांचपंचवीस पाहुण्यांसाठीं सरदारगृह थाटायचं आहे असं समजलास कीं काय तूं ?

**सोन्या०**—तुम्हीच म्हणालांत व्यवस्था चोख राहिली पाहिजे—

**धीरेंद्र०**—हां, समजलों. आचरट कुठला. जा!

**सोन्या०**—बरं, पण साहेब, एक समजलंच नाहीं अजून.

**धीरेंद्र०**—काय?

**सोन्या०**—पाहुणेमंडळी यायची ती कोणत्या दिवशीं आणि कोणत्या गाडीनं?

**धीरेंद्र०**—अरे, खरंच कीं. मी विसरलोंच हा मुद्दा. पाहूं हं पत्रांत डॉक्टरसाहेब पुढें काय लिहितात तें. (पुन्हां पत्र वाचूं लागून) हां, कुठंपर्यंत झालं? "तेव्हां आपल्या सूचनेप्रमाणें पद्माताईस घेऊन आपल्याकडे दोन दिवस रहावयास येईन म्हणतों." ठीक. पुढें? "मात्र हें केव्हां जमेल तेव्हां खरें. अगदीं आजच निघण्याची माझी व पद्माची इच्छा होती; परंतु पद्माच्या कांहीं मैत्रिणी बडोद्याची ट्रिप काढणार असून त्या तिला आग्रहानें आपल्याबरोबर नेत आहेत. त्यामुळें पद्मा बडोद्याहून परत येईपर्यंत आमचें लोणावळ्यास येणें लांबणार हें उघडच आहे." हात्तेच्या! म्हणजे पाहुण्यांचं येणं आठ दहा दिवस लांबलंच म्हणायचं! सोन्या, कशाला आणतोस मटार आणि मुसुंबी? जा, लाग आपल्या सैपाकाला!

**सोन्या०**—पण साहेब, आतां तरी पत्र पुरं वाचलं आहांत ना? नाहीं तर खालीं एखादा ताजा कलम असेल अन् त्यांत डॉक्टरनीं लिहिलं असेल आजच येतों म्हणून!

**धीरेंद्र०** - नाहीं रे बाबा, ताजा कलम नाहीं शिळा कलम नाहीं. कांहीं नाहीं. ही पाहिलीस एकदम डॉक्टरांची सही आहे, के. के. गुणे.

**सोन्या०**—मग काय उपायच नाहीं. (आंत जातो.)

**धीरेंद्र०**—(येरझारा घालीत) ही पद्मा मुलगी कशी काय असेल बरं? फोटोंत तर झकास दिसते आहे! (टेबलाच्या खणांतला एक फोटो काढून कांहीं वेळ पहातो व पुनः ठेवतो.) वाटलं होतं एक दोन दिवसांतच गांठ पडेल या मुलीची. पण लांबली. अच्छा, जाना दो! (टेबलापाशीं जाऊन) हें दुसरं पत्र कोणाचं आहे पाहूं या.

(पत्रावरचा पत्ता पहात) आं ! आलं कां या हस्ताक्षराचं पत्र पुन्हां ? अर्थात् आमचे दोस्त रत्नकांत यांनीं वीणा नांवाची कोण मुलगी मुंबईस गांठली आहे तिचं हें पत्र ! यावर नांव जरी धडधडीत माझं आहे तरी वास्तविक तें आहे रत्नकांताला धाडलेलं. जवळ जवळ एक दिवसा-आड एक पत्र येतं आहे तिचं याला. कशासाठीं बेट्यानं तिला थाप दिली आहे आपण धीरेंद्र सारस्वते आहोंत म्हणून कुणास ठाऊक ?

[ रत्नकांत बाहेरून धीरेन् धीरेन् म्हणून हांक मारतो. ]

आलीच स्वारी. या वीणेचीं हीं पत्रं यायला लागल्यापासून स्वारी रोज डाकेच्या वेळेस कशी नेमकी हजर रहायला लागली आहे. (पत्र खिशांत घालतो. रत्नकांत प्रवेश करतो.) हं, या महाराज.

**रत्नकांत**०–(बसतां बसतां) काय धीरेन्, रोजचा फेरफटका झाला तुझा ?

**धीरेंद्र**०–हो, आत्तांच आलों फिरून परत.

**रत्न**०–आज गुरुवार. तुझा वजन करायचा दिवस. केलंस का वजन ?

**धीरेंद्र**०–हो, केलं ना !

**रत्न**०–मग ? कांहीं वाढलं आहे का ?

**धीरेंद्र**०–नाहीं रे. लोकांचीं वजनं थंड हवेच्या ठिकाणीं आल्या-बरोबर भराभर वाढतात कशीं मला कळतच नाहीं. मुंबईच्या त्या गिरणी-वाल्याची ती बायको तुला माहीत आहे ना ? तिचं वजन दर आठवड्याला पांच दहा पौंडानं वाढतं आहे. मला वाटतं तिच्या नवऱ्यानं तिला लवकर इथून हलवलं तर बरं. नाहीं तर ती लवकरच तीन चारशे पौंडांच्या घरांत जाईल, अन् हा कापसाचा गठ्ठा इथेंच ठेवून आपली गिरणी लोणावळ्यास सुरू करण्याची पाळी येईल त्या पारशावर ! (दोघेही हंसतात)

**रत्न**०–बरं तें जाऊं दे. आमचं कांहीं पत्र असलं तर काढ.

**धीरेंद्र**०–मला माहीतच तें. माझ्या प्रकृतीच्या चौकशीचं नुसतं निमित्त. खरा आला आहेस तूं वीणेच्या पत्राच्या ओढीनं ! रतन, काय पागल बनला आहेस एका पोरीच्या नादानं !

रत्न०—तर, तर! तूं मोठा सोंवळाच कीं नाहीं? तुझ्या कासोट्याचं अगदीं पाणी प्यावं लोकांनीं! पद्माला इथं राह्यला बोलावतो आहेस तें तिच्या बापाच्या हातचं औषध घ्यायसाठींच असेल? हंः! अरे, बाभळींनीं बोरीला कशाला हंसायचं? हं. चल, दे पत्र कुठं आहे तें.

धीरेंद्र०—एका अटीवर देईन.

रत्न०—बोल.

धीरेंद्र०—स्वतःला धीरेंद्र म्हणून घ्यायचा हा उपद्याप तूं कशासाठीं केला आहेस, आणखी तुझी आणि या वीणेची पत्रापत्री कशासाठीं चालू आहे तें सारं मला नीट एकदां उलगडून सांग पाहूं.

रत्न०—सांगितलं नाहीं का मागंच तुला?

धीरेंद्र०—काय सांगितलंस? वीणा नांवाच्या एका फक्कड पोरीची अन् तुझी मुंबईस अकस्मात् गांठ पडून तुमचं दोघांचं एकमेकांवर प्रेम जडलं, अन् ती तुला धीरेंद्र सारस्वते समजत असून माझ्या नांवावर अन् पत्त्यावर येणारीं तिचीं पत्रं मीं न फोडतां तुला दिलीं पाहिजेत यापलीकडे कांहीं सांगितलं नाहींस मला.

रत्न०—कां बरं? वीणा किती सुंदर आहे, ती बोलते कशी, चालते कशी, हंसते कशी, तें सारं रोज एकदां तरी सांगतोय मी तुला!

धीरेंद्र०—तें ऐकून कंटाळलों मीं.

रत्न०—कंटाळलास? धिक्कार असो तुझ्या अरसिकतेला! अरे, माझी सुंदर वीणा—

धीरेंद्र०—आं? तुझी झालीसुद्धां कां ती इतक्यांत?

रत्न०—अं...अं...अरे, झाल्यासारखीच आहे!—कां, तुझ्या पोटांत दुखायला लागलं वाटतं?

धीरेंद्र०—छे, छे! ती तुला खरंच मिळाली तर मी तुझं अभिनंदनच करीन. पण तूं स्वतःला धीरेंद्र सारस्वते म्हणवून घ्यायची जी ही भानगड करून ठेवली आहेस ती एखादे वेळीं माझ्या गळ्याशीं आली म्हणजे? आपण 'धीरेंद्र' आहोंत अशी वीणेला थाप देण्यांत तुझा हेतू तरी काय आहे?

**रत्न०**—अरे, पण जी गोष्ट मीं केलीच नाहीं तिच्यांतला हेतु काय सांगू तुला ?

**धीरेंद्र०**—म्हणजे काय ? तूं त्या पोरीला सांगितलं नाहींस तुझं नांव धीरेंद्र असं ?

**रत्न०**—छे: ! मीं मुळींच नाहीं सांगितलं तसं. तिनंच मला ठरवलं धीरेंद्र, अन् तिच्या त्या ठरवण्याला मी नकळत मान्यता दिली इतकंच. त्याची काय गंमत झाली तुला सांगतों. पंधरा दिवसांपूर्वीं मी मुंबईस गेलों तुला आठवतं ना ? त्या वेळेस माझ्या सूटकेसचीं कुलपं आयत्या वेळेस नादुरुस्त झालेलीं आढळलीं म्हणून तुझी सूटकेस घेऊन जायचा तूं मला आग्रह केलास, आठवतंय कीं नाहीं ?

**धीरेंद्र०**—होय, आठवतंय.

**रत्न०**—मग त्या तुझ्या सूटकेसमध्येंच या साऱ्या भानगडीचं मूळ आहे बघ ! मी सूटकेसवांचून तसाच मुंबईस जायचं म्हणत होतों. पण तूंच मला आग्रहानं आपली सूटकेस न्यायला लावलीस. अर्थात् मला धीरेंद्र व्हावं लागलं आहे या भानगडीचं कर्तृत्व तुझ्याकडेच येतं. त्याबद्दल मला दोष देण्यांत कांहीं अर्थ नाहीं. हं चल, आण माझं पत्र कुठं आहे तें.

**धीरेंद्र०**—अरे वा ! बराच आहेस कीं ! माझी सूटकेस न्यायचा मी तुला आग्रह केला याचा अर्थ सुंदर पोरी वाटेंत भेटल्या, तर त्यांना स्वतःचं नांव लपवून माझं नांव सांगायची मीं तुला परवानगी दिली असा होतो कीं काय ?

**रत्न०**—अलबत् होतो ! कसा तो पहा. तुझ्या सूटकेसवर ‘ धीरेंद्र सारस्वते ’ असं नांव लिहिलेलं आहे हें तर कबूल आहे तुला ?

**धीरेंद्र०**—बरं, मग ?

**रत्न०**—अरे, त्या नांवानंच केली आहेन् ही सारी मजा. त्या दिवशीं आमची गाडी नेरळच्या स्टेशनवर उभी राहिली तेव्हां एक सुंदर मुलगी माझ्या डब्यांत शिरली. तिच्याबरोबर एक मध्यम वयाची

बाई होती. त्या दोघी माथेरानला गेल्या होत्या वाटतं, अन् परत मुंबईस चालल्या होत्या. डब्यांत शिरल्यापासून ती मुलगी तुझ्या त्या सूटकेसकडे अन् माझ्याकडे आळीपाळीनं सारखी पाहूं लागली. शेवटीं ती आपल्या जागेवरून उठून माझ्याजवळ आली अन् हंसत म्हणाली, " आपला Autograph पाहिजे आहे मला ! " मीं दचकून विचारलं, " माझा ? " तेव्हां अधिकच गोड हंसून ती म्हणाली, " हो ! सुप्रसिद्ध नाटककार धीरेंद्र सारस्वते आपणच ना ? आपलीं सगळीं नाटकं मीं वाचलीं आहेत, अगदीं पुन्हां पुन्हां वाचलीं आहेत. तीं मला फारच आवडतात. आपल्याला प्रत्यक्ष डोळयांनीं पहायची इच्छा आज किती तरी वर्षे माझ्या मनांत आहे. ती आज अकस्मात् पुरी झाली त्यामुळं फार फार आनंद होतो आहे. " तिचं तें गोड गोड बोलणं ऐकण्यांत, अन् त्यावेळचे हावभाव आणि हातवारे पहाण्यांत मी इतका तन्मय होऊन गेलों, कीं " तें सारं खरं, पण मी धीरेंद्र नाहीं ! " असं सांगून टाकायचं मला भानच राहिलं नाहीं.

**धीरेंद्र०**—शाबास ! फार शहाणा आहेस म्हणायचा !

**रत्न०**—अरे, आणखी दुसरी अशी गंमत झाली कीं, तिनं जसं मला पाहिल्याबरोबर ओळखलं कीं मी धीरेंद्र—

**धीरेंद्र०**—ओळखलं ? कीं चुकीनं ठरवलं ?

**रत्न०**—हां, तसं म्हण, पण तिच्याप्रमाणेंच मींही तिला पहातांच ओळखलं, अन् माझा तर्क खरा ठरला. ती जेव्हां जरा वेळ माझ्याशीं बोलत बसली तेव्हां मीं तिला मधेंच म्हटलं, " तुम्हांला मी ओळखत नाहीं असं समजूं नका. ' अप्सरा ' सिनेटोनमधल्या प्रसिद्ध नटी वीणादेवी तुम्हीच ना ? तुमचे फोटो मीं पाहिले आहेत. चित्रपटांतलं काम पाह्यचा कांहीं योग आला नाहीं, पण तुमच्या कामाची फार तारीफ वाचली आहे वर्तमानपत्रांत. तुम्ही भेटलांत, मला फार आनंद झाला ! "

**धीरेंद्र०**—मग मुंबईस गेल्यावर सकाळ संध्याकाळ ' अप्सरा ' सिनेटोनमध्यें खेटे घालण्यावांचुन कांहीं केलं नसशील ?

**रत्न०**–छे रे, एकदांसुद्धां गेलों नाहीं त्या स्टुडिओंत. कांहीं कारणानं स्टुडिओ होता वाटतं बंद, अन् वीणेला होता मोकळा वेळ. तेव्हां तीच येत होती माझ्याकडे सरदारगृहांत, अन् आम्हीं जात होतों फिरायला, सिनेमाला, किंवा हॉटेलांत जेवायला. आमचं खूपच प्रेम जमलं अन् शेवटीं आमचं ठरलं, कीं इथं लोणावळ्यास तिनं यावं, अन् मग एकमेकांनीं लग्नाच्या आणाशपथा घ्याव्या.

**धीरेंद्र०**–म्हणजे तें वीणेचं प्रकरण आतां इथें यायचं आहे कां ?

**रत्न०**–हो ना. त्याचसाठीं तर आमचीं हीं पत्रं चाललीं आहेत रोज एकमेकांना ! हां, दे, दे बाबा कुठं आहे तें पत्र. केव्हां उघडून वाचीनसं झालं आहे !

**धीरेंद्र०**–हें घे. (पत्र देतो. जरा थांबून) काय म्हणताहेत वीणादेवी ?

**रत्न०**–( पत्र वाचून एकदम आनंदानें ) दोस्ता, टाळी दे !

**धीरेंद्र०**–अरे, हो हो ! अशा उड्या काय मारतो आहेस ? काय झालं तरी काय ?

**रत्न०**–अरे, काय झालं ? वीणा येणार ! आज येणार ! आत्तां अकरा वाजतां येणार !

**धीरेंद्र०**–काय म्हणतोस, आत्तां अकरा वाजतां येणार ? अन् हें जमायचं कसं रे बाबा ? कांहीं विचार केला आहेस कां ?

**रत्न०**–विचार ? तो कसला रे बुवा ?

**धीरेंद्र०**–अरे दीडशहाण्या, तुला धीरेंद्र समजून वीणा इथं पाहुणी येणार—

**रत्न०**–हो, मग ?

**धीरेंद्र०**–(नमस्कार करून) नमस्कार आहे तुझ्या बेअकलीपणाला. अरे, वीणा इथं आली कीं खरा धीरेंद्र मी आहे हें नाहीं कां तिला समजायचं ? तिला तूं इथें उतरवून घेणार कशी, अन् आपलं हें सोंग कायम ठेवणार कसं ?

**रत्न०**-( नमस्कार करून ) कमाल आहे तुझ्याच बेअकलीपणाची !

**धीरेंद्र०**-माझ्याच कां ?

**रत्न०**-हो ! तुझ्याच नाहीं तर काय ? व्यर्थ नाटकं लिहितोस ! एक साधी गोष्ट तुझ्या लक्षांत येऊं नये ?

**धीरेंद्र०**-साधी गोष्ट ? ती काय बुवा ?

**रत्न०**-अरे ! वीणा इथें येईल अन् राहील तेवढ्या अवधींत मीच होणार धीरेंद्र ! या बंगल्यांत मी येऊन राहणार, इथं मालकासारखा वावरणार, अन् तुला आपली सोय दुसरीकडे करायला सांगणार !

**धीरेंद्र०**-आतां मात्र आपल्याला कोपरापासनं हात जोडले पाहिजेत अं ! आपलं हें प्रेमाचं तारूं फार भडकलं महाराज ! माफ करा. ही असली गुंतागुंत वाढवूं नका. शहाणे असाल तर वीणा इथें आल्याबरोबर तिला सांगून टाका सारा खरा प्रकार.

**रत्न०**-मोठा विद्वानच आहेस ! अरे, मी धीरेंद्र नाहीं असं कळतांच वीणा पहिल्या गाडीनं मुंबईस परत जाईल. मी धीरेंद्र नाटककार या समजुतीनं तर ती मला एवढी चिकटली आहे ! तें काहीं नाहीं. आणखी कांहीं दिवस तरी मला धीरेंद्रच राहिलं पाहिजे, आणखी तिचा आदर-सत्कार मला याच बंगल्यांत केला पाहिजे. मी मोरे वर्णन केलं आहे तिच्या-जवळ या बंगल्याचं !

**धीरेंद्र०**-चांगलं केलं आहेस बाबा !

**रत्न०**-चांगलं म्हण वाईट म्हण, पण माझा खरा जिवलग दोस्त असशील तर या वेळीं माझ्यावर टीका न करतां मला मदत कर, येवढी विनंति आहे तुला. मला धीरेंद्र राहूं दे कांहीं दिवस, अन् हा बंगला अन् तुझा सोन्या आचारी माझ्या स्वाधीन कर.

**धीरेंद्र०**-अन् मी काय करूं ? आपल्या स्वार्थापुढें तुला माझा कांहीं विचार ? तुझ्या स्वाधीन बंगला करायचा, अन् मी कुठं जायचं ? धर्मशाळेंत ?

**रत्न०**-अरे, माझा खरा स्नेही म्हणवतोस अन् धर्मशाळेला भितोस ? खऱ्या मित्रानं दोस्तासाठीं आपले प्राणसुद्धां द्यायला तयार असलं पाहिजे, समजलास ?

**धीरेंद्र०**—हो, तेवढे मागत नाहींस येवढी कृपाच म्हणायची! साफ सांगतों हा बंगला सोडून मी जायचा नाहीं! माझी पद्मा यायची आहे आठ दहा दिवसांत, त्यासाठीं बंगला झकास सजवायचा आहे मला!

**रत्न०**—ए, तुझ्या पाया पडतों, असा घात करूं नकोस माझा!

**धीरेंद्र०**तें कांहीं चालायचं नाहीं. मी या बंगल्यांतून हलायचा नाहीं.

**रत्न०**—आतां काय करावं तुझ्या हट्टाला? अरे, माझ्या जन्माच्या कल्याणाचा प्रश्न आहे, अन् तूं दोन चार दिवस इथून नाहींसा व्हायला तयार नाहींस?

**धीरेंद्र०**—नाहीं, नाहीं, नाहीं!

**रत्न०**—(एकदम चुटकी वाजवून आनंदानें) ओ हो! सुचली एक कल्पना! Beautiful! All right! रहा, रहा तूं याच बंगल्यांत.

**धीरेंद्र०**—(आनंदानें) होय? वीणेला दुसरीकडे घेऊन जायचं ठरवतोस?

**रत्न०**—छे छे, तिला मी इथेंच आणणार. मीसुद्धां धीरेंद्रच राहणार. पण मला जी नवी युक्ति सुचली आहे तिच्यामुळं तुलाही या बंगल्यांतच रहातां येईल.

**धीरेंद्र०**—तें कसं काय बुवा? तूंही धीरेंद्र आणि मीही धीरेंद्रच?—

**रत्न०**—हां, इथेंच तर माझी नवी कल्पना आहे. मी धीरेंद्र रहायचं हें खरं. पण तूं दुसरंच कुणी तरी व्हायचंस. माझा नोकर म्हणेनास? मी बडा नाटककार तेव्हां मी एक सेक्रेटरी नोकरीला ठेवलेला असणं अगदीं सहाजिक आहे. तूंच तो सेक्रेटरी. तुझं नांव पंडितराव खोटे. बास्, बास्, बास्! काय डोकं चाललंय! काय डोकं चाललंय माझं! लोक बेटे उगीचच म्हणतात कीं, प्रेमानं डोकं बहकतं म्हणून. मला तर वाटतं, प्रेमाची आंच लागली कीं डोकं जादा काम द्यायला लागतं! बास्, बास्, दोस्ता, आतां नाहीं म्हणायचं नाहीं हं. ठरलं. या क्षणापासून मी धीरेंद्र अन् तूं पंडितराव खोटे! माझा सेक्रेटरी!

**धीरेंद्र०**—अरे पण गृहस्था, हें नाटककाराचं सोंग तूं चालवणार किती दिवस? कायमची कां करणार आहेस नाटककाराची बतावणी?

**रत्न**०–छे छे, तें आपल्याला बापजन्मीं नाहीं साधायचं !

**धीरेंद्र**०–मग शहाणा असशील तर माझं ऐक.

**रत्न**०–काय ऐकूं ?

**धीरेंद्र**०–वीणा आत्तां आल्याबरोबर तिला चक्क सांगून टाक, कीं कळसपूरचे जहागीरदार दाजीसाहेब कुबेर यांचा मी एकुलता एक मुलगा रत्नकांत. एल्. एल्. बी. च्या टर्मस् भरतों अन् अभ्यासाऐवजीं चन करतों. बापानं सुटींत घरीं बोलावलं तर तब्येत जरा बिघडली आहे असं सांगून लोणावळ्यास मुक्काम ठोकायला कमी करीत नाहीं. आणखी—

**रत्न**०–बास्, बास् कर आपला शहाणपणा हं ! अरे, खऱ्या हकीगतीचा असा स्फोट मी आत्तांच केला कीं त्यानं दचकून चांगलं हातांत आलेलं पाखरूं उडून जाणार. वीणेला खरं काय तें केव्हां तरी एकदां सांगायचंच आहे. त्याबद्दल वादच नाहीं. पण त्याला योग्य वेळ आली पाहिजे. सध्यां मी धीरेंद्र अन् तूं माझा सेक्रेटरी पंडितराव, अशीच बतावणी झाली पाहिजे छानपैकीं !

**धीरेंद्र**०–अरे, पण असं करण्यांत काय धोका आहे, काय अडचणी आहेत, याचा कांहीं विचार ?

**रत्न**०–हें पहा, तुझा हा उपदेश आतां नको आहे मला. चार दिवसांपुरतं मला धीरेंद्र होऊं देऊन माझा सेक्रेटरी व्हायला तुला सांगतों आहे, तर हजार शंका काढतो आहेस काय ? मला मदत करायचं तुझ्या मनांत नसलं तर एकदां स्पष्ट सांगून टाक पाहूं. म्हणजे असाच आपल्या बंगल्यांत परत जातों अन् पिस्तूल उडवून जिवाचा अंत करतों.

**धीरेंद्र**०–अरे अरे अरे ! अगदीं एकाद्या नाटकांतला हीरो बोलतो तसं बोलायला लागला आहेस कीं !

**रत्न**०–तुला पुनः सांगतों ही चेष्टेची वेळ नाहीं. करतोस कीं नाहीं मला धीरेंद्र अन् होतोस कीं नाहीं तूं पंडितराव ? बोल.

**धीरेंद्र**०–त्रागात्र करतो आहेस तेव्हां करतों बाबा कबूल. या, बसा माझ्या खुर्चीवर आपण या क्षणापासून आपण धीरेंद्र सारस्वते,

अन् मी आपल्या हुकमाचा ताबेदार पंडितराव खोटे. ( नमस्कार करून वांकून उभा राहतो.) काय आज्ञा आहे सांगावी मालक!

[ रत्नकांत मोठ्यानें हंसतो. त्याच वेळीं सोन्या मधल्या दारांतून डोकावून पहातो. ]

**सोन्या०**–(स्वगत) अरेच्या, नाटकांतल्या एखाद्या प्रवेशाची तालीम चालली आहे कीं काय? ( मोठ्यानें खांकरतो. )

**धीरेंद्र०**–( वळून पाहून ) सोन्या, बरं झालं आलास बाबा. हें बघ, एका नाटकांत काम करावं लागणार आहे तुला!

**सोन्या०**–( आनंदानें ) होय? मी तर आज किती दिवस आपल्या मागं लागलों आहे कीं मला एकाद्या नाटकांत चान्स द्या म्हणून. आचारी व्हायच्यापूर्वी नटच होतों साहेब मी!

**रत्न०**–होय? अरे मला माहीत नव्हतं हें. कुठल्या कंपनींत रे?

**सोन्या०**–वा! अशा तशा नव्हे, सुप्रसिद्ध 'गांजा मारुती प्रासादिक कंपनीं'त बारा वर्षं होतों मी. कोंवळा होतों त्या वेळीं स्त्रीपार्ट करीत होतों, पुढं मिशी आणि आवाज दोन्ही एकदमच फुटली अन् लागलों पुरुषपार्ट करायला! पण अजून एकदां पुन्हां स्त्रीपार्ट करायची फार हौस आहे. एकदां चान्स द्या मला, अन् बघा तरी माझी करामत!

**रत्न०**–काय म्हणतोस सोन्या, तुला स्त्रीपार्ट द्यायचा? मग मात्र मराठी रंगभूमीचीं भरलींच शंभर वर्षं!

**सोन्या०**–उगाच चेष्टा करूं नका साहेब. नाहीं बालगंधर्वांची नक्कल हुबेहुब करून दाखविली तर मिशी उतरून देईन!

**रत्न०**–अरे, स्त्रीपार्ट करायचा म्हणजे ती तुला आधींच उतरावी लागणार!

**सोन्या०**–खरंच कीं. बरं मिशी नाहीं तर दुसरं काय म्हणाल तें उतरून देईन. कोणता स्त्रीपार्ट देतां बोला.

**धीरेंद्र०**–ए शंखा, कसली स्त्री अन् कसला पार्ट घेऊन बसला आहेस?

**सोन्या०**—तुम्हीच म्हणालांत कीं मला नाटकांत काम मिळायचं आहे म्हणून.

**धीरेंद्र०**—अरे होय, पण तें नाटक स्टेजवर व्हायचं नाहीं. इथं आपल्या घरांत व्हायचं आहे! व्हायचं कसलं सुरूच झालंय म्हणेनास आतांपासून? मात्र तुला रंगसफेती, पोषाख, कांहीं एक करायला नको आहे. कारण आचाऱ्याचंच काम करायचं आहे तुला या नाटकांत.

**सोन्या०**-हाय रे दैवा! नाटकांतसुद्धां आचारीच! (बैठक मारतो.)

**धीरेंद्र०**—या क्षणापासून पुन्हां मी सांगेपर्यंत मी धीरेंद्र नाहीं.

**सोन्या०**—मग?

**धीरेंद्र०**—हा धीरेंद्र. याला चुकून कधीं रत्नकांत म्हटलंस तर खबरदार हं. कोण हा?

**सोन्या०**—धीरेंद्र.

**धीरेंद्र०**—शाबास! नक्कल लवकर पाठ करणारा नट दिसतोयस!!

**सोन्या०**—' गांजामारुति प्रासादिक कंपनीं 'त उगीच नव्हतों बारा वर्षं साहेब!

**धीरेंद्र०**—अन् मी कोण आहें माहीत आहे कां?

**सोन्या०**—सांगा ना.

**धीरेंद्र०**—मी धीरेंद्राचा नोकर. सेक्रेटरी. माझं नांव पंडितराव खोटे.

**सोन्या०**—आलं लक्षांत, पंडितराव खोटे!

**धीरेंद्र०**—पक्क्या लक्षांत ठेव हं या गोष्टी.

**सोन्या०**—पण साहेब, एक विचारूं का?

**धीरेंद्र०**—काय?

**सोन्या०**—या तुमच्या नाटकांत स्त्रीपार्ट एकही नाहीं?

**रत्न०**—वा वा! आहे तर!

**सोन्या०**—मग कसंही करून तेवढा स्त्रीपार्ट द्या कीं मला. चांगला वठवीन. गॅरंटी देतों.

**रत्न०**–तें झालं रे. पण तो पार्ट आधींच एका कुलीन नटीकडे दिला आहे. आत्तांच्या गाडीनं दाखल होईल ती. (बाहेर मोटारीचें शिंग वाजतें.) आलीच वाटतं! सोन्या, जा बघ.

(पुन्हां शिंग जोरजोरानें वाजतें. नंतर दारावरची घंटा वाजते. सोन्या धांवत दाराकडे जातो. जातां जातां स्वगत "सारे स्त्रीपार्ट पळवले या बायकांनीं!" असें म्हणतो.)

**सोन्या०**–(कांहीं वेळानें परत येऊन धीरेंद्रास) साहेब, वीणादेवी नांवाची कोणी बाई आली आहे बाहेर. बरोबर एक दोन ट्रंका आहेत. उतरायलाच आली आहे वाटतं इथें.

**रत्न०**–(आश्चर्यानें) काय? वीणा? गाडीनं यायच्याऐवजीं बेत बदलून मोटारनं आली वाटतं? शाबास! सोन्या, हुशार! आपलं नाटक सुरू झालं हं. पडदा वर चालला, संभाळ. मी धीरेंद्र. हा पंडितराव खोटे. लक्षांत ठेव नीट. नाहीं तर घात करशील. जा जा, बाहेर आलेल्या बाईच्या त्या ट्रंका उचलून आंत आण. हो पुढें! मी 'धीरेंद्र सारस्वते' त्यांचं स्वागत करायला आलोंच.

(सोन्या जातो व त्याच्या मागोमाग रत्नकांत जातो. सोन्या लगेच वीणाचें सामान घेऊन परत येतो. आंतल्या खोलींत जातां जातां तो धीरेंद्राजवळ थांबतो.)

**सोन्या०**–मालक, हें आहे तरी काय गौडबंगाल? मला नीट सांगा तरी.

**धीरेंद्र०**–स्! मूर्खा, मला मालक म्हणूं नकोस. तो बाहेर गेला आहे तो धीरेंद्र. विसरलास वाटतं इतक्यांत? हं चल, आंत चल. तें सामान कुठं ठेवायचं तें तुला सांगतों.

(दोघेही आंत जातात. दुसऱ्या बाजूनें रत्नकांत व वीणा येतात.)

**वीणा०**–(प्रवेश करतांच आधीं दिवाणखान्यांत सगळीकडे दृष्टि टाकून) अहाहा! धीरेंद्रांच्या खोलींत त्यांच्याशीं विनोदपरिहास करायचं माझं कितीक वर्षांचं सुखस्वप्न आज खरं होणार! किती थोर माझं भाग्य! किती रम्य स्थळ आहे हें!

**रत्न०**—ये, बैस अशी या खुर्चीवर. तूं अखेर खरोखरच आलीस यामुळं मला किती आनंद झाला आहे म्हणून सांगूं ? पण खरं सांगायचं म्हणजे माझं एक सुख तूं हिरावून घेतलंस हं !

**वीणा०**—म्हणजे काय बाई ?

**रत्न०**—तुझं स्वागत करायला स्टेशनवर येणार होतों तों तूंच एकदम माझ्या दारांत दत्त म्हणून उभी राहिलीस. गाडीच्या डब्यांतून तुझा हात धरून तुला खालीं उतरविणार होतों, तें माझं सुख तूं हिरावून घेतलंस—चांगलं कां हें ?

**वीणा०**—( मोठ्यानें हंसून ) असं म्हणतां होय ? त्याचं असं झालं, आमच्या शेजारचे एक गृहस्थ अकस्मात् निघाले पुण्याला जायला आपल्या मोटारींतनं. ते म्हणाले, वाटेंत सोडतों तुम्हांला लोणावळ्यास धीरेंद्रांच्या बंगल्यांत. मीं म्हटलं, ठीक आहे, दोन तास आधीं जायला मिळतं आहे; म्हणून आलें. मी अगदीं उत्कंठित झालें होतें इथें यायसाठीं.

**रत्न०**—मीसुद्धां किती उत्कंठित झालों होतों तुला कल्पना नाहीं.

**वीणा०**—मी एकदम आल्यानं तुमच्या लिहिण्यांत तर व्यत्यय नाहीं ना आला ? काय लिहिणं चाललं होतं ? पाहूं तरी. ( टेबलापाशीं जाऊन तिथले कागद चाळवते. )

**रत्न०**—( एकदम पुढें होऊन तिला अडथळा करून ) छेछेछेछे ! असे कागदबिगद नाहीं हं पाह्यचे !

**वीणा०**—वा ! मी तर मनाशीं कित्ति कित्ति कल्पना करीत आलें आहें. तुम्ही कसं लिहितां, केव्हां लिहितां, लिहितांना कसे बसतां, कसा विचार करतां, हें अगदीं तुमच्या खोलींत, तुमच्याजवळ बसून मला पहायला मिळेल अशी मोठी आशा धरून आलें आहें मी.

**रत्न०**—छे ! वेडी तर नाहींस ? मी तर मनाशीं ठरवलं ,आहे कीं तूं इथें आहेस तंवर कागदाला टांक म्हणून लावायचा नाहीं !

**वीणा०**—हें काय गडे ? तें नाहीं हं चालायचं. मी इथें आहें तंवर एकदां तरी चांगलं तासभर माझ्यादेखत तुम्हीं लिहीत बसलंच पाहिजे !

**रत्न०**–बरं, तो वाद आत्तांच कशाला पाहिजे आहे ? दमून आली आहेस. चहाबिही घे, थोडी विश्रांति घे. पंडितराव, अरे पंडितराव !

**वीणा०**–पंडितराव कोण ?

**रत्न०**–माझा सेक्रेटरी आहे. ( पंडितराव प्रवेश करतो. ) हा पहा आलाच. अरे पंडितराव, या वीणादेवी हं. ( तीं दोघें हस्तांदोलन करतात. ) जा. सोन्याला म्हणावं सुंदरपैकीं चहा लवकर आण पाहूं.

**धीरेंद्र०**–ठीक आहे. ( जातां जातां स्वगत ) बेट्यानं शिकार तर फक्कड साधली आहे ! पण आमच्या पद्माबाई इथं येऊन दाखल व्हायच्या आंत याची ही शिकार सुखरूप तडीला लागली तर ठीक. ( जातो. )

**वीणा०**–मोठा चुणचुणीत, अन् देखणा दिसतो आहे तुमचा सेक्रेटरी.

**रत्न०**–( स्वगत ) आं ! हा देखणा दिसायला लागला कां हिला ! ( उघड ) काय त्या देखणेपणाला करायचंय ? म्हणतात ना गोरा गोमटा अन् कपाळकरंटा !

**वीणा०**–अगबाई ! म्हणजे ?

**रत्न०**–काय सांगायचं ? आमचा पंडितराव वरनं असा देखणा दिसतो आहे खरा, पण आंतनं दहा रोगांनीं पोखरलं आहे त्याला !

**वीणा०**–अरे अरे ! काय होतंय तरी काय त्यांना ?

**रत्न०**–कांहीं विचारूं नकोस ! ॲनिमिया, डिस्पेप्सिया, मलेरिया, सगळीं दुखणीं पाळीपाळीनं होत असतात त्याला. सध्यां क्षयाच्या तावडींत सांपडला आहे. (स्वगत) आतां काय बिशाद हिची दृष्टि त्याच्या-कडे वळेल !

**वीणा०**–तुमचं हें बोलणं ऐकल्यापासून मला त्यांच्याविषयीं जास्तीच सहानुभूति वाटायला लागली आहे.

**रत्न०**–वाटली तरी ती दाखवूं नकोस हं त्याला ! बायकांच्याविषयीं मोठीं विचित्र मतं आहेत स्वारीचीं. उठतां बसतां लाथा पाहिजेत बायकांना असं उघड उघड बोलून दाखवायला कमी करीन नाहीं तो !

**वीणा**०–वा! म्हणजे मोठे शहाणेच आहेत म्हणायचे! असले सेक्रेटरी तुम्हीं ठेवलेत तरी कसे मी म्हणतें ?

**रत्न**०–काय करायचं ? बिचाऱ्याला कुठेंच थारा मिळेना. उपाशी मरत होता. तेव्हां दिला आहे आश्रय.

**वीणा**०–किती उदार हृदय तुमचं !

**रत्न**०–कसचं! कसचं! तुझ्या हृदयाची सर त्याला कुठली येणार ? खरंच वीणे, तुझं निष्पाप सरळ हृदय इतक्या अल्पावधींत मीं जिंकलं याबद्दल माझा मला केवढा तरी अभिमान वाटतो.

**वीणा**०–पण तुम्हांला मी पुन्हां पुन्हां सांगतें तें खोटंच वाटतं कां? मला समजूं लागलं तेव्हांपासूनच नाटककाराबद्दल मला विलक्षण आकर्षण वाटायला लागलं. तुमच्या कीर्तीनं माझं हृदय आधींच अंकित करून घेतलं होतंत तुम्हीं. तुमच्या कीर्तीचा विचार केला, कीं माझ्या प्रेमाचा स्वीकार तुम्हीं केलांत तरी कसा असं आश्चर्य वाटतं.

**रत्न**०–मला तर उलट भय वाटतं, कीं माझी खरी योग्यता काय आहे हें जर तुला कळलं तर तुझं माझ्यावरचं प्रेम ताबडतोब उडेल !

**वीणा**०–वा ! हीच का केलीत माझ्या प्रेमाची परीक्षा ? ( तितक्यांत धीरेंद्र सोन्याला चहाच्या सामानासह घेऊन येतो. सोन्या बशा, पेले मांडूं लागतो व धीरेंद्र जवळ उभा राहातो.) तुमच्या त्या......काय त्याचं नांव बरं ?...त्या नाटकांतल्या नायिकेच्या तोंडीं तुम्ही काय पद घातलं आहे तें आहे ना लक्षांत ? काय बरं ? (आठवल्यासारखं करून) हो–

**नाहिं धन विचारिलें।**
**नाहिं कुल विचारिलें।**

पुढें काय बरं ? ( पुन्हां त्याच दोन ओळी म्हणून पुढचं आठवण्याचा प्रयत्न करून ) आठवत कसं नाहीं ? सांगा ना तुम्ही !

**रत्न**०–मी ? अं—अं...काय बरं ? अं—

**वीणा**०–इश्श् ! स्वतःच्याच पदांतले शब्द आठवत नाहींत म्हणजे चमत्कारच म्हणायचा !

**रत्न०**–पंडितराव, काय रे पुढें ?

**धीरेंद्र०–मधुर पाशिं गुंतलें ।**

**प्रेमरंगिं रंगलें । हें मन ॥**

**रत्न०**–बरोबर आहे, आठवलं आतां. "प्रेमरंगिं रंगलें, हें मन" (वीणा मोठमोठ्यानें हंसते) आं ? हंसायला काय झालं ?

**वीणा०**–हंसूं नको तर काय करूं ? नाटक तुमचं, अन् त्यांतलीं पदं आठवतात या पंडितरावांना ! खाशी !

**रत्न०**–मग त्याला सेक्रेटरी म्हणून ठेवला आहे तो उगीच कीं काय ? माझ्या मेंदूवरचा अर्धा भार संभाळलाच पाहिजे त्यानं ! मीं तर आतांशा लिहिण्याचंसुद्धां काम त्याच्यावरच सोपवलं आहे. माझी भाषा-शैली माहीत झाली आहे आतां त्याला. म्हणून मी फक्त मुख्य कल्पना बसवून प्रवेशांची रूपरेखा देतों त्याला समजावून, कीं तो सुटतो सर सर सर लिहीत. दिसेलच तुला !

**वीणा०**–होय ? (आनंदानें) मग मी तुमची झालें अन् अहोरात्र तुमच्या सहवासांत राहिलें, कीं मीसुद्धां अशी होईन का तरबेज ?

**रत्न०**–तर ? अलबत !

**वीणा०**–(हर्षानें) अहाहा ! केवढं थोर माझं भाग्य ?

[दारावरची घंटा वाजते. कोण आहे तें पहावयास धीरेंद्र जातो व परत येऊन रत्नकांतास खूण करून बाजूला बोलावतो. वीणा आपली बॅग उघडून आरसा काढते व केसांवरून कंगवा फिरवीत रहाते.]

**रत्न०**–(धीरेंद्रास एकीकडे) काय रे ? कोण आहे ?

**धीरेंद्र०**–(एकीकडे) कोण काय ? तुझा गडी आलाय तुझ्या आचाऱ्याचा निरोप सांगायला. जेवायचं होत आलं आहे. आंघोळीला बंगल्यावर येणार कां पोहायला जाणार विचारलं आहे तुला त्यानं.

**रत्न०**–(एकीकडे) मग त्याला सांगूं नयेस कां कांहीं कारणामुळें मी आपल्या बंगल्यावर परत न जातां इथेंच जेवणखाण, उठणं-बसणं सगळं——

**धीरेंद्र०**–( एकीकडे ) तें तुझं तूंच सांग बाबा काय तें—

**रत्न०**–( एकीकडे ) बरं मी सांगतों. त्यांत काय मोठं ? (जातो.)

**वीणा०**–( धीरेंद्र जवळ येतो त्यास ) तुमच्याविषयीं मला फार सहानुभूति वाटते.

**धीरेंद्र०**–हो, या घटकेला झाली आहे खरी माझी केविलवाणी स्थिति. तुम्ही सहानुभूति दाखवितां हें पाहून त्यांतल्या त्यांत समाधान वाटतं.

**वीणा०**–अहो, मलाच काय, पण कुणालाही वाटेल सहानुभूति तुमच्याबद्दल. क्षय म्हणजे कांहीं लहान सहान दुखणं नाहीं.

**धीरेंद्र०**–( स्वतःशीं ) क्षय ? ( गोंधळून तिच्याकडे पहातो )

**वीणा०**–पण मी म्हणतें एकपरी क्षयाचीसुद्धां तुम्हांला भीति वाटूं नये. कारण, जें तुमचं शरीर ॲनीमिया, मलेरिया, डिस्पेप्सिया अशा रोगांच्या हल्ल्यांतून टिकाव धरून राहिलं, तें क्षयाला तरी काय म्हणून बळी पडेल ?

**धीरेंद्र०**–( स्वतःशीं ) आमच्या मित्रवर्यांनीं तोंडाला आल्या त्या थापा दिलेल्या दिसताहेत आमच्याबद्दल ! छान ! ( उघड ) हो. तुम्ही म्हणतां तें कांहीं खोटं नाहीं. तुमच्या बोलण्यानं मला केवढा धीर आला म्हणून सांगूं !

**वीणा०**–मी आणखीसुद्धां धीर दिला असता हो. पण—

**धीरेंद्र०**–पण काय ?

**वीणा०**–पण तुम्ही सहानुभूतीला फारसे पात्र नाहीं. बायकांना उठल्या बसल्या झोडपलं पाहिजे अशा मताचे आहांत म्हणे तुम्ही ! आत्तांच धीरेंद्रानीं सांगितलं.

**धीरेंद्र०**–( स्वगत ) चांगलं केलं ! ( उघड ) अं...तसंच कांहीं नाहीं अगदीं, पण—( रत्नकांत येतो. )

**रत्न०**–पंडितराव, अरे बोलत काय राह्यलास ? आधीं तेवढी माझीं दोन पत्रं लिहून तयार कर. एक त्या कल्लोळ नाटक कंपनीच्या मालकाला. त्याला लिहायचं कीं या महिनाअखेर तुमच्याकडनं पैशांचा

हत्ता आला नाहीं, तर वकिलामार्फत नोटीस द्यावी लागेल. अन् दुसरं त्या दरवेश संगीत मंडळीला लिहायचं, कीं तुम्हीं त्या नव्या भसाड्या आवाजाच्या नकट्या नटीकडे माझ्या नाटकांतल्या नायिकेचं काम द्यायचं बंद केलं नाहीं तर प्रयोगावर इंजंक्शन आणूं! अं?

**धीरेंद्र०**–आलं लक्षांत. (स्वगत) बेट्यानं जन्मांत कधीं नाटक लिहिलं नाहीं, पण सरावल्यासारखं सोंग आणलं आहेन् ऑथरचं!

**रत्न०**–(वीणेस) लोकांना वाटत असतं नाटककाराचं जिणं म्हणजे गुलाबाचा सुगंधी ताटवा! पण त्यांतनं चालतांना कसे कांटे बोंचत असतात आमचे आम्हांला माहीत.

**वीणा०**–पण आपणच आपल्या नाटकांत एके ठिकाणीं म्हटलं आहे ना, कीं प्रेमाची सोबत असली कीं संसाराची वाट चालतांना कांट्यांचं भान उरत नाहीं, अन् गुलाब फुलाचा परिमल तेवढा माण-साला सारखा येतो!

**धीरेंद्र०**–(स्वगत) हिनं माझीं सारीं नाटकं तोंडपाठ केलीं आहेत कीं काय तरी?

**रत्न०**–तशी सोबत करायची तुझी इच्छा आहे असंच सुचविलंस तूं म्हणायचं—

**वीणा०**–हां हां! सुतानं स्वर्गाला जायची खोडच आहे मेली पुरुषांची!

**रत्न०**–रागावलीस वाटतं?—बरं चल, तुझी खोली दाखवून ठेवतों तुला. तूं स्नान आटपून पोषाख कर, म्हणजे तुझी लहर असली तर आपण जरा बाहेर फेरी मारून येऊं जेवायच्या आधीं.

**वीणा०**–O, Yes!

(रत्नकांत वीणेसह जातो. दारावरील घंटा वाजते.)

**धीरेंद्र०**–(दाराशीं जातो व एक तारेचा लिफाफा घेऊन तो उघडीत परत येतो. वाचल्यावर स्तंभित होऊन उभा रहातो.) या अल्ला! या खुदा! (कपाळावर हात मारतो.)

**रत्न०**–( प्रवेश करून ) आं ! आमचे सेक्रेटरी नमाज पडताहेत कीं काय ? ( जवळ येऊन ) कायरे, काय, झालं काय ?

**धीरेंद्र०**–हें पहा, ए बाबा, तुझ्या नाटकाची नांदी झाली, एक प्रवेश अर्धामुर्धा झाला, आतां बस् झाला हा खेळ. तुझ्या वीणेला आत्तांच्या आतां खरा प्रकार सांगून टाक अन् आपल्या बंगल्यावर घेऊन जा पाहूं !

**रत्न०**–अरे वा, एखाद्या थिएटरच्या मवाली मालकासारखा तडकाफडकी नोटीस देऊन खेळ बंद पाडतो आहेस कीं माझा !

**धीरेंद्र०**–ही चेष्टेची वेळ नाहीं महाराज ! मला पंडितराव खोट्याचं सोंग यापुढें करतां यायचं नाहीं.

**रत्न०**–अरे, अरे ! अगदीं शालूसाठीं अडणाऱ्या स्त्रीपार्ट्याची तऱ्हा आणलीस कीं !

**धीरेंद्र०**–पुन्हां सांगतों रतन, चेष्टेची वेळ नाहीं ही !

**रत्न०**–अरे, पण झालं काय असं?

**धीरेंद्र०**–काय सांगूं कपाळ ? पद्मा येऊन दाखल होते आहे आत्तां !

**रत्न०**–पद्मा ?—

**धीरेंद्र०**–हो पद्मा.

**रत्न०**–आत्तां ?

**धीरेंद्र०**–आत्तां–आत्तां !

**रत्न०**–अरे, पण ती आठ दहा दिवस यायची नव्हती ना ?

**धीरेंद्र०**–पण तिची बडोद्याची सफर रद्द झाली, अन् तिला घेऊन तिचे वडील आत्तां सकाळीं एक्सप्रेसनं निघाले आहेत. ही बघ तार. ( तार देतो. )

**रत्न०**–( तार वाचतो. ) 'Padma's trip to Baroda cancelled. Reaching Lonavala morning Express.' नारायण ! आतां रे ?

**धीरेंद्र०**–आतां शहाणा असशील तर वीणेजवळ खरी गोष्ट कबूल कर, अन् तिला घेऊन आपल्या बंगल्यांत जा.

**रत्न०**–यापेक्षां मला संन्यास घ्यायला कां सांगत नाहींस ?

**धीरेंद्र०**–संन्यास घे नाहीं तर वानप्रस्थाश्रम घे. यापुढें 'धीरेंद्र' म्हणून तुला या बंगल्यांत मी राहूं देणार नाहीं येवढं खरं.

**रत्न०**–चांगला, चांगला पाळतो आहेस मित्रधर्म हं !

**धीरद्र०**–हें पहा, आतां वेळच अशी आली आहे, कीं तुझं तरी साधेल किंवा माझं तरी साधेल. अशा वेळीं तुला मी मदत करणं शक्य नाहीं. मला अप्पलपोटा म्हटलंस तरी चालेल. पद्मा इथें येणार ती खऱ्या धीरेंद्राला तिची पारख करतां यावी म्हणून, अशा वेळीं तूं धीरेंद्र राहून कसं चालेल ?

**रत्न०**–कां चालूं नये मला कळत नाहीं बुवा ! तुला तिची परीक्षा करायची आहे ना ? मग पंडितराव खोट्याच्या सोंगांत राहून ती करतां येईल तुला ! मी जरी नांवाला धीरेंद्र राहिलों तरी तुझ्या वल्लभेकडे वांकड्या डोळ्यानंसुद्धां पहाणार नाहीं. तुला वचन देतों.

**धीरेंद्र०**–तूं पहाणार नाहींस. पण तुला धीरेंद्र समजून पद्माची नजर नेहमीं तुझ्याकडे राहील त्याची काय वाट ?

**रत्न०**–हो, हा एक प्रश्न आहे खरा.

**धीरेंद्र०**–येवढाच नाहीं. आणखीसुद्धां एक प्रश्न आहे.

**रत्न०**–कसं म्हणतोस ?

**धीरेंद्र०**–अरे, धीरेंद्राच्या —म्हणजे तुझ्या प्रियाराधनाचा स्वीकार करायला पद्मा आली आहे हें तुझ्या वीणेला कळल्यावर ती तुझे कान शाबूत राहूं देईल कां ?

**रत्न०**–( कान चाचपीत ) खरंच कीं !

**धीरेंद्र०**–म्हणून म्हणतों महाराज, झाला येवढा पोरकटपणा बस् झाला !

**रत्न०**–( एकदम कल्पना सुचल्यासारखें करून ) पण कायरे, मी म्हणतों असं केलं तर ?

**धीरेंद्र०**–आणखी कसं बाबा ?

**रत्न०**—वीणा कशासाठीं इथें आली आहे त्याची पद्माला दाद लागूं द्यायची नाहीं, अन् पद्मा कशासाठीं आली आहे त्याची वीणेला दाद लागूं द्यायची नाहीं! आं ?

**धीरेंद्र०**—हें पहा रतन, असं खोट्यानं खोटं वाढत गेलं म्हणजे तेल जाईल, तूप जाईल अन् तुझ्या माझ्या हातीं धुपाटणं येईल; दुसरं तर कांहीं नाहीं.

[ दारावरची घंटा जोरजोरानें वाजते. सोन्या धांवत दारापर्यंत जातो व परत येतो ]

**सोन्या०**—( धीरेंद्राकडे पाहून ) मालक—

**रत्न०**—ए सोन्या, मी धीरेंद्र आहें हें विसरलास वाटतं ? कोण आलंय ?

**सोन्या०**—डॉ० गुणे नांवाचे कोण पाहुणे यायचे होते ना, ते आलेले दिसतात.

**रत्न०**—( दाराकडे जात ) होय कां ? यावं यावं डॉक्टरसाहेब—

**धीरेंद्र०**—( त्याला ओढून ) ए बाबा, अजून विचार कर.

**रत्न०**—( एकीकडे ) तूं घाबरूं नकोस रे ! माणसाला खोटं बोलायसाठीं जीभ मिळालेली आहे. ती जोपर्यंत आपण अक्कलहुशारीनें वापरूं तोपर्यंत भ्यायचं कांहीं कारण नाहीं.

[ डॉ० गुणे व पद्मा प्रवेश करतात. ]

**डॉ० गुणे०**—( धीरेंद्राकडे पाहून ) नमस्कार, नमस्कार. आपणच धीरेंद्र ना ?

[ तो ' होय ' म्हणण्याच्या बेतांत असतो. इतक्यांत रत्नकांत त्याला ओढून मागें करतो. ]

**रत्न०**—नाहीं. मी !......नमस्कार. हा माझा सेक्रेटरी आहे. पंडितराव याचं नांव.

**डॉ० गुणे०**—आपण धीरेंद्र, नाहीं का ? वाटलंच पाहिल्याबरोबर ! हां, या आमच्या पद्मानाई ! ये बेटा, ये पुढें. अग वेडे, लाजतेस काय अशी ? (रत्नकांतास) अलीकडच्या कॉलेजांतल्या मुलींच्या मानानं जरा

लाजरी आहे आमची ताई. पण संघटण वाढलं कीं चांगलीच धीट होते हो! दिसेलच तुम्हांला आतां.

रत्न०—हां, पाहूं कीं. (पद्मेकडे पाहून) या बसा ना. अशा उभ्या कां? बसा, बसा डॉक्टर! (सगळीं बसतात.) डॉक्टर, तुम्ही यांना घेऊन आलांत फार छान झालं! स्त्रीपुरुषांनीं परस्परांना नीट पाहिल्याशिवाय लग्न करायचे दिवस आतां नाहीं उरले.

डॉक्टर०—कबूल आहे मला. म्हणूनच ताईला घेऊन आलों इथें. म्हटलं होऊं जाऊं द्या पहाणं!

रत्न०—मी आपला फार आभारी आहें त्याबद्दल. आपल्यासारखीं समजुतदार माणसं आपल्या समाजांत आहेत कुठें? मात्र डॉक्टर, तुम्हांला आणखी यांना एक सूचना करून ठेवायची आहे हं मला.

डॉक्टर०—ती काय बुवा?

रत्न०—ती अशी, कीं सध्यां माझी एक लांबची बहीण माझ्याकडे पाहुणी आली आहे. तिचं नांव वीणा. माझ्या वडिलांनीं जी एक मुलगी ठरवली आहे माझ्यासाठीं तिच्याशींच मी लग्न करावं असा मला आग्रह करायला ती इथं आली आहे. ती जरी तरुण आहे तरी प्रीतिविवाहाबद्दल तिचं मत फार प्रतिकूल आहे.

डॉक्टर०—असं? तें कां बुवा?

रत्न०—अहो, मांजराचं कढत दुधानं तोंड भाजलं, कीं त्याचं त्याबद्दल वाईट मत नाहीं कां होत?

डॉक्टर०—अशी भानगड आहे होय?

रत्न०—हां. तेव्हां तिला अगदीं कळतां कामा नये तुम्हीं यांना घेऊन इथें कशासाठीं आलांत तें. आपल्याला जें करायचं आहे तें आपण गुपचुप करूंच. पण, तुमची अन् तिची ओळख करून देतांना मी तिला सांगणार आहें, कीं तुम्ही माझे लांबचे चुलतमामा लागतां, आणखी मला फारा दिवसांनीं भेटायला म्हणून लेकीला घेऊन आला आहांत!

डॉक्टर०—असं असं! म्हणजे मी जसा कांहीं तुमचा मामा!

**रत्न०**—लांबचे मामा.

**डॉक्टर०**—कां होईना ? आणखी आमची ताई तुमची मामेबहीण ?

**रत्न०**—हां असंच !

**डॉक्टर०**—ठीक ! नाटककाराच्या घरीं यायचं म्हणजे सोपं काम नाहीं म्हणायचं. केव्हां कसलं सोंग घ्यावं लागेल नेम नाहीं. पद्माताई, पाहिलंस ना ?

**पद्मा०**—इश्श, त्यांत काय पहायचं आहे ? जग म्हणजे एक रंग-भूमि आहे, अन् आपण सारीं माणसं तिच्यावरच्या पात्रांसारखीं आहोंत असं नाहीं तरी म्हटलंच आहे. ( रत्नकांताकडे पाहून ) नाहीं का ?

**रत्न०**—( हंसून ) तेंच कीं !

**डॉक्टर०**—वा, वा ! मोठं मार्मिक सुभाषित आहे. कुणाचं बरं हें सुभाषित ?

**रत्न०**—अहो, आपल्या कालिदासाचं ! उगीच नाहीं त्याचं शार्दूल-विक्रीडित डोक्यावर घेऊन नेपोलियन थयथया नाचला !

**पद्मा०**—इश्श ! कालिदासाचं कुठलं तें सुभाषित ? (धीरेंद्राकडे पाहते.)

**रत्न०**—(स्वगत) अरे बापरे, चुकलंच वाटतं आमचं ! (धीरेंद्राकडे पाहतो. धीरेंद्र कपाळावर हात मारतो. )

**धीरेंद्र०**—( पद्माकडे बघून ) शेक्सपियरचं तें सुभाषित आहे असं तुमचं म्हणणं ना ? हंः ! पण तें मूळ कालिदासाचं आहे असा आमच्या या धीरेंद्रांनीं शोध लावला आहे. इतकंच नाहीं तर शेक्सपियरचीं सारीं नाटकं वाङ्मयचौर्य करून लिहिलेलीं आहेत असं यांचं मत आहे !

**पद्मा०**—अगबाई ! खरं ?

**डॉक्टर०**—म्हणजे आपण नुसते नाटककारच नव्हे तर संशोधकही आहांत म्हणायचे !

**रत्न०**—आहे झालं कांहीं तरी ! बरं, आतां असं, जेवण अगदीं तयार झालं असेल. तेव्हां आपण स्नानं उरकून घेत असाल तर पहा.

**डॉक्टर॰**–(उठत) हो हो, कांहीं हरकत नाहीं.

[ वीणा प्रवेश करते. ]

**वीणा॰**–( येतां येतां ) हं, माझं स्नान अन् पोषाख आटपला हं! ( रत्नकांताच्या जवळ येऊन ) चलणार ना जरा फिरायला? ( डॉ॰ गुणे व पद्मा यांच्याकडे दृष्टि गेल्यावर आश्चर्यानें ) अगबाई!

**रत्न॰**–तुझी यांची ओळख करून देतों. डॉक्टरसाहेब, ही वीणा. ही कोण अन् इथें कशाला आली आहे तें मी आपल्याला मघाशींच सांगितलं आहे.

**वीणा॰**–इश्श! यांनासुद्धां कशाला सांगायला हवं होतं?

**रत्न॰**–वा, सांगायला हवं तर! अन् वीणा, हे डॉ॰ गुणे, माझे मामा. ( वीणा नमस्कार करते. ) अन् ही पद्माताई—

**पद्मा॰**–( स्वगत ) ताई! इश्श—

**रत्न॰**–ही ह्यांची लेक!

**वीणा॰**–म्हणजे तुमची बहीण! ( तिचा हात धरून ) वा! मोठी सुंदर नणंद मिळणार म्हणायची मला!

**पद्मा॰**–नणंद? ( शेजारीं धीरेंद्र उभा असतो त्याच्याकडे आश्चर्यानें पाहते. )

**धीरेंद्र॰**–( पद्मेस एकीकडे ) या अलीकडच्या शिकलेल्या मुलींना बहीण, भावजय, नणंद यांतला फरक कळतो आहे कुठें?

**रत्न॰**–( घाबरून वीणेला दूर ओढीत ) अरे पंडितराव, मामांना अन् पद्माला आंत नेऊन चहाबिही दे पाहूं. जा जा. उशीर होतो. ( धीरेंद्र त्यांना घेऊन जातो. ) वीणे, चल पाहूं आपण बागेपर्यंत फिरून येऊं.

**वीणा॰**–पण आतां कसं फिरायला जायचं? माझी नणंद मला भेटली तिच्याशीं जरा गप्पा गोष्टी—

**रत्न॰**–अग बया, नणंद नणंद म्हणून केवढ्यांदा ओरडते आहेस!

**वीणा०**—इश्श्, म्हणजे काय बाई ? नणंदेला नणंद नाहीं म्हणायचं तर काय ?

**रत्न०**—अग, पण जरा सबूर ! चल बाहेर चल, तुला सांगतों. ( तिला ओढूं लागतो. )

**वीणा०**—इश्श्, असं ओढायचं काय ?

**रत्न०**—अग प्रेमाची ओढ म्हणतात ती हीच कीं ! [ मोठ्यानें हंसतो. वीणा त्याच्याकडे आश्चर्यानें पाहते. अखेर तो तिला बाहेर नेतो. ]

**पडदा.**

# अंक २ रा.

## प्रवेश १ ला.

[ कळसपूरचे इनामदार दाजीसाहेब कुबेर यांच्या वाड्यांतील दिवाणखाना. बाहेरच्या दारानें हैबती नांवाचा म्हातारा गडी प्रवेश करतो. प्रवेश केल्यानंतर तो दिवाणखान्यांतल्या सगळ्या सामानाची साफसुफी करतो, व तें जागच्याजागीं ठेवलें आहे कीं नाहीं तें तपासण्याच्या आविर्भावानं इकडे तिकडे हिंडतो हिंडतां हिंडतां तो आपल्या मनाशीं पुढीलप्रमाणें पुटपुटत राहतो.]

**हैबती**०–( स्वगत ) नवा गडी कामाला ठेवला कीं लै तरास! त्यानं सारीं कामं नीट उरकलीं का न्हाई याच्यावर सारखी नजर ठेवतां ठेवतां जीव असा हैरान होतो कीं वाटतं त्यापरीस आपून जातीनं काम केलेलं काय वाईट? ही कुंडी या टेबलावर ठेवायची न्हाई म्हून धा येळा सांगितलं असल म्यां या शिरप्याला. पर त्येचं तें आपलं खरं. ( कुंडी उचलून दुसऱ्या टेबलावर ठेवतो.] अन् हें बगा. धाकलं धनीसाब रतनकांत साहेब ह्यांचा ह्यो फोटो ह्या न्हवं त्या टेबलावर ठिवायचा असं या शिरप्याला सांगून दमलों मी. शिरप्यां, ए शिरप्यां—

( आंतल्या खोलींतून श्रीपती धांवत येतो.)

**श्रीपती**०–मला हांका मारल्यात व्हय हैबतीमामा?

**हैबती**०–शिरप्यां, मला हैबतीमामा कशापायीं म्हनतोस तूं? चार दिवस झालं न्हाई तुला नोकरीला ठेवून, अन् माझ्यासंगं मामा मामा म्हून सलगी करतोस गाढवा! तुझी आई काय माझी भन लागती व्हय! नीट आदबीनं बोलत जा माझ्यासंग. माझं नांव पुन्हां घेतलंस तर तुझं कवळं थोबाड फोडून टाकीन! माझ्यापुढं आलास, कीं जी नाईकसाब, व्हय नाईकसाब असं गुनानं बोलत जा. दाजीसाहेब कुबेरांच्या—कळसपूरच्या इनामदारांच्या घरांतल्या संमद्या नोकरांचा नाईक हाय मीं, समजलास?

माझी नीट आदब ठेवीत जा. अन् हें बघ, या दिवानखान्यांतली दरेक गोष्ट जिथल्या तिथं ठेवीत चल. ( त्याचा कान पकडून ) गुलामा, ही कुंडी त्या टेबलावर कशापायीं ठेवलीस ? कुठं ठेवाया सांगितली व्हती तुला ? अन् ह्यो फोटो ?

**श्रीपती**०–लय चिमखडा हाय नाईकसाब !

**हैबती**०–फोटो कसा हाय म्हून इचारलं व्हय तुला ? कुठं ठेवायचा ?

**श्रीपती**०–त्या टेबलावर. चुकलों नाईकसाब. माफ करा.

**हैबती**०–अन् धनीसाहेबांचा दुधाचा गलास अजून ठेवला न्हाइस त्या टेबलावर ? आठ वाजल. पाहिलं न्हाईस घड्याळांत ? धनीसाब रोज सकाळीं मेह्नत करूनशान इथं दिवाणखान्यांत आल्याबराबर त्यासनी दुधाचा गलास दिसावा लागतो, ठावं नाहीं झालं तुला अजून ? कवा ठेवनार तूं गलास आनून ? काय, करीत काय व्हतास इतका येळ ?

**श्रीपती**०–पल्याडली रूम शाप करीत होतों जी.

**हैबती**०–काय साफ करीत व्हतास ? रूम ? म्हंजे रे काय ?

**श्रीपती**०–हां रूम ! खोलीला रूम म्हनतात जी ! साहेबलोकांचा शबूद हाय म्हन त्यो ! !

**हैबती**०–शिप्यां, सायबाच शबूद माझ्यासमूर बोलत जाऊं नगस. सारी उमर गेली माझी सायबाचा एकसुदा शबूद ऐकल्याखेरीज. रूम म्हनं रूम ! खोली नाहीं म्हनता येत तुला ? अन् ती खोली साफ करायला इतका वखत लागला तुला ?

**श्रीपती**०–नाईकसाब, तुम्हीच एकदां त्या खोलींत जाऊनशान बघा, अन् मग सांगा ती खोली झटपट कशी झटकायची ती ? आपल्या धनीसायबांच त्ये दोस्त म्हातारबुवा, काय त्येंचं नांव बगा—

**हैबती**०–भय्यासाहेब इधाते ?

**श्रीपती**०–हां हां, त्येच बगा.

**हैबती**०–आफ्रिकेंतनं नुकतच परत आल त्ये ?

**श्रीपती०**–हां हां, हंग त्येच बगा.

**हैबती०**–त्येंचं काय? त्ये त्या खोलींत हायेत म्हनतोस काय?

**श्रीपती०**–तसं न्हव नाईकसाब. पर त्येंच्याकडून आपल्या धनी-साहेबांना आलेल्या भेटीच्या चिजांनीं ती रूम—चुकलों नाईकसाब, ती खोली–चिक्कार भरून गेलीया बगा. वाघाचीं कातडीं, हरनाचीं कातडीं, शिसवीच्या काठ्या, हत्तीच दांत, रानडुकराचीं मुंडकीं, पेंढा भरलेलं अस्वाल—नुसता अजबखाना झालाय त्या खोलीचा. मला तर बगा, त्या खोलींत पाय टाकायचा म्हटलं कीं वाटतं, आतां आफ्रिकेच्या जंगलांतच शिरायचं आपल्याला, अन् दरदरून घाम सुटतो बगा! अन् भय्यासाहेबां-कडून मिळालेलं, आतांशा आपल्या देवडीवर बांधल्यालं तें जंगली कुत्रं भोंकलं, कीं वाटतं जनूं वाघच–(बाहेर कुत्रा मोठ्यानें भोंकतो) अयाईग! नाईकसाब ती पिडा आली वाटतं इकडं! (त्याला बिलगतो.)

**हैबती०**–हत् गाढवा! कुत्रं भोंकतंया तकडं, अन् तुला कापरं भरलया हतं व्हय? जा, व्हो म्होरं! कोन आलया बग. (त्याला ढक-लतो. तो विंगपर्यंत जातो आणि तेथून देवडीपर्यंत पाहिल्यासारखं करतो.) कोन हाय र?

**श्रीपती०**–तारवाला शिपाई दिसतोया नाईकसाब!

(तारवाला ओरडतो, 'दाजीसाहेब कुबेरांची तार आहे!')

**श्रीपती०**–मग म्होरं या कीं राव. तिथनंच काय वरडताय?

(तारवाला ओरडतो 'पण हा वाघ आहे ना वाटेत?')

**श्रीपती०**–(हंसून) त्यो काय खातोय व्हय तुम्हांस्नी? लई शूर दिसताय कीं राव!

**हैबती०**–अर वा! दुसऱ्याला छान शिकवतुयास शूरपनाच्या गोष्टी. धांव, धांव! घेऊन ये तार!!

(श्रीपती बाहेर जातो. आंतून दाजीसाहेब कुबेर प्रातःकाळचीं स्तोत्रें म्हणत व दंडाला पीळ घालींत बाहेर येतात.)

**दाजी०**–काय हैबती, नवी जुनी बातमी?

**हैबती०**–काय न्हाई. समदं ठीक हाय धनी.

**दाजी०**—तरी पण ?

**हैबती०**—काल माझ्या धाकट्या लेकानं जत्रेच्या फडांत मोठी कुस्ती मारली.

**दाजी०**—असं का ? छान. कुस्तीचा षोक पाहिजेच तरुण माणसांना. आमच्या रत्नकांताला पुष्कळ सांगतों मी; पण त्याचं कांहीं तालमीकडे लक्ष लागत नाहीं. या अलिकडच्या कॉलेजांतल्या मुलांना तांबड्या मातीची लाज वाटायला लागली आहे.

**हैबती०**—त्यासनीं काय करायचं धनी कुस्त्या मारून ?

**दाजी०**—अरे, असं कसं म्हणतोस ? या वयांत आम्ही किती मेहनत करीत होतों अन् किती कुस्त्या मारीत होतों तें आठवतं ना तुला ?

**हैबती०**—ह्ये काय इचारतां धनी ? या समद्या टापूंत आपल्याला जोड न्हव्हता दुसरा. पर तो जुना जमाना आतां राहलाय म्हनतां ? काळ फिरला आतां. षोकबी बदलल. धाकल धनी कशाला करतील मेहनत ? सायबावानी यस फ्यस शिकतील, लै मोठा रोजगार पटकावतील, एकादी झोंकनोक पोरगी आवा म्हून घरांत आनतील—

**दाजी०**—अरे, तेंसुद्धां ऐकत नाहीं तो. लग्न करायचं नाहीं म्हणून हट्ट घेऊन बसला आहे.

**हैबती०**—छट् धनीसाब ! काय तरीच कसं ऐकन मी ? मरद कुठं लग्नाला न्हाई म्हनतोय व्हय ?

**दाजी०**—तुला काय सांगायचं आतां ?

[ श्रीपती तार घेऊन परत येतो. दाजीबा सही करून कागद देतात, तो घेऊन श्रीपती बाहेर जातो. दाजीबा तार उघडून वाचतात. तेवढ्यांत श्रीपती परत येतो. ]

**दाजी०**—अरे हैबती, तुझे धाकटे धनी येताहेत बरं का. त्यांचीच तार आहे ही. त्याला आल्याबरोबर चहा लागेल. सगळी तयारी ठेव. अन् आमचं दूध कुठं आहे रे आज ?

**हैबती०**—शिर्प्या, धांव, दूध आन लवकर.

[ श्रीपती जातो. पडद्यांतून हांक ऐकू येते. " दाजीसाहेब, अहो दाजीसाहेब ! आहांत कां घरांत ? "]

**हैबती०**–आपलं आफ्रिकेंतल दोस्त आलं जनूं.

( बाहेर कुत्रा भोंकतो. " अरे बेट्या माझ्यावरसुद्धां भोंकतोस काय ? " असे भय्यासाहेबांचे शब्द ऐकूं येतात. )

**दाजी०**–होय, भय्यासाहेबच आले खास. हैबती, शिर्प्याला म्हणावं दुधाचे दोन ग्लास आण हं. ( हैबती जातो. )

**भय्या०**–( प्रवेश करून ) काय दाजी, म्हटलं भेटतोस कां नाहीं. तुझ्या जोरबैठका एकदां सुरू झाल्या, कीं तूं मेहनतखान्यांतून केव्हां बाहेर येशील त्याचा नेम नाहीं.

**दाजी०**–नाहीं रे भय्या, आतां शरीर थकायला लागलं. आत पुरती पांचशें बैठकसुद्धां मारवत नाहीं. अन् शेर दीडशेर दूध घेतलं कीं ढेंकर येते. म्हातारपण वाईटच एकंदरींत. आपण दोघंही ऐन जवानींत होतों तेव्हां या आपल्या गावांत आपण दोघांनीं मिळून किती मस्ती केली–

**भय्या०**–अन् किती दंगे केले–

**दाजी०**–किती कुरापती काढून मारामाऱ्या केल्या–

**भय्या०**–अन् किती मुरळ्या नाचविल्या अन् तमाशे खेळवले–

**दाजी०**–तें सगळं आठवलं, कीं गेले ते जवानीचे दिवस म्हणून वाईट वाटतं. नवी पिढी आपली परंपरा चालवील म्हणावं तर तसंही कांहीं चिन्ह दिसत नाहीं.

**भय्या०**–तर काय ? हीं तरुण पोरं. कां काय सोंगं म्हणायचीं ? लग्न करा म्हणून आम्ही आग्रह करतों आहोंत, अन् हीं पोरं म्हणताहेत नाहीं. आमच्या बापांनीं असा आग्रह केला असता तर आम्हीं दहा लग्नं करून मोकळे झालों असतों.

**दाजी०**–अन् बेट्या तीं केलीं नसशील तरी कशावरून ? तिकडे परदेशांत होतास; खोऱ्यानं पैसा ओढीत होतास; काय काय गोंधळ घातले असशील आम्हांला कशाला कळणार आहेत ?

**भय्या०**—हो! अन् तूं अगदीं प्रभु रामचंद्रासारखा एकपत्नीव्रतानं राहिला असशील इथें. कालच सखाराम पाटील मला सांगत होते—

**दाजी०**—ए बाबा, जाउं दे ना तें आतां. एकमेकांच्या उखाळ्या पाखाळ्या काढायच्या आहेत कां आपल्या दोन पोरांचं लग्न करायचं आहे तुला?

**भय्या०**—अरे, त्यासाठीं तर आलों सकाळच्या प्रहरीं. काय, तुझा पोरगा काय म्हणतो?

**दाजी०**—ही बघ, आतांच त्याची तार आली आहे. मोटारीनं निघाला आहे; कदाचित् आत्तां इतक्यांतच येईल ( श्रीपती दुधाचे ग्लास आणतो. ) हं घे, दूध घे.

**भय्या०**—काय इतकं? इतकं नाहीं जायचं बाबा.

**दाजी०**—अरे तोंडाला लाव म्हणजे जातं आपोआप. काय सोंग करतो आहेस? लहान होतास तेव्हां खास तुझ्यासाठीं तुझ्या बापानं म्हैस ठेवली होती.

( दोघे दूध पिऊं लागतात. बाहेर मोटारचा आवाज होतो. हैबती धांवत येतो. )

**हैबती०**—धनी, धाकल धनीसाब आल.

**दाजी०**—होय कां? त्याला म्हणावं सरळ इकडेच ये. ( हैबती जातो ) ए भय्या, रतन आला. जुनी पिढी अन् नवी पिढी यांच्यांतला लढाईचा नमुना व्हायचा आहे आतां. कच खाऊं नकोस.

**भय्या०**—हत्, ती गोष्टच सोड रे!

( दोघेही उरलेलं दूध संपवितात. तितक्यांत रत्नकांत प्रवेश करतो. )

**दाजी०**—काय रतन, आलास? प्रवासाचा त्रास नाहीं ना झाला?

**रत्न०**—( अंगांतले कपडे काढून हैबतीजवळ देत ) झाला असला तरी काय उपयोग? तुम्हीं मला यायला लावलंत खरं. तारा-मागून तारा काय धाडल्यात! मी तिकडे अभ्यासाच्या कोण धांदलींत!

**दाजी०**—सध्यां तर तुला सुट्टी आहे.

**रत्न०**—अहो, कॉलेजांतला अभ्यास सुटींतच जास्ती करायचा असतो. पण तें तुम्हांला कळायचं नाहीं. तेव्हां तें जाऊं दे. मला तारावर तारा कशासाठीं केल्यात तें सांगा.

**दाजी०**—अरे, सांगतों सगळं बेताबेतानं. त्यासाठींच तर तुला बोलावलं आहे. हे कोण इथें बसले आहेत ओळखलंस का ?

**रत्न०**—नाहीं बुवा.

**भय्या०**—अरे दाजी, तो कसं ओळखील मला ? मी आफ्रिकेंत गेलों तेव्हां तो येवढासा होता. माझ्यापासून गुलाम गोट्या मागून घेत असे खेळायला, अन् बर्फी किती खात असे त्याला तर सुमार नाहीं. अजूनसुद्धां आवडते कां रे बर्फी तुला, रतन ?

**रत्न०**— बर्फी ? शीः !

**भय्या०**—( हंसून ) काय, नाहीं आवडत म्हणतोस ? हंः हंः ! चालायचंच. वयाबरोबर आवडीनिवडी बदलायच्याच. चांगला उणापुरा वाढला आहेस हं रतन. छान दिसतोयस.

**दाजी०**—अहो, तरी तालीम करीत नाहीं किती सांगितलं तरी ! रतन, हे भय्यासाहेब विधाते. तुझ्या लहानपणीं हे आफ्रिकेला गेले, आणि तिथनं आतां खूप पैसा मिळवून परत आले आहेत इथें कायमचे राहायला. यांची आमची फार दोस्ती होती पूर्वी, अन् आम्हीं दोघांनीं ठरवलं होतं कीं, यांना जर मुलगी झाली तर तिला मीं सून करून घ्यायची.

**रत्न०**—तुमची सून ? म्हणजे माझी बायको कीं काय ?

**दाजी०**—मग नाहीं तर काय ? सुदैवानं त्यांना मुलगी झाली. तिच्याबद्दल मीं तुला पत्र लिहिलं होतं.

**रत्न०**—हो, अन् मी उत्तरही लिहिलं होतं, कीं बापानं मुलगी ठरवावी अन् मुलानं तिच्याशीं लग्न करावं हें मला पसंत नाहीं म्हणून.

**भय्या०**—( हंसून ) अगदीं हेंच वाक्य—अरे दाजी, अगदीं बरोबर हेंच वाक्य माझ्या पोरीनंही आपल्या पत्रांत मला लिहिलं आहे. हीं मुलं काय कादंबऱ्यांतलीं वाक्यं पाठ करतात कीं काय ? ( हंसतात. )

**रत्न०**—काय म्हणतां, आपल्या लेकीनं बरोबर हेंच वाक्य आप॰ल्याला लिहिलं ? तिच्याविषयीं मला फार आदर वाटायला लागला आहे.

**दाजी०**—अरे आदरच काय, हलके हलके लग्नालासुद्धां तयार होशील तूं. म्हणून तर तुझं नकाराचं पत्र आलं तरी तुला इकडे बोलावून घेतलं. या गोष्टीच अशा आहेत, कीं समक्ष बोलणं चालणं झालं, कीं माणसाचं मन पालटतं हळूं हळूं.

**रत्न०**—पण माझं मन पालटणं शक्य नाहीं.

**दाजी०**—तें बघूं आतां. मी काय म्हणतों तें ऐकून तर घेशील ?

( हैबती चहा आणून रत्नकांतापुढें ठेवतो. )

**रत्न०**—हं, सांगा काय सांगायचंय तें. मी चहा घेतों.

**दाजी०**—मी आणखी भय्यासाहेब एकमेकांचे स्नेही.

**भय्या०**—अगदीं जीवश्च कंठश्च !

**दाजी०**—तेव्हां आमची साहजीकच इच्छा—

**भय्या०**—कीं पुढच्या पिढींतही हा स्नेह दृढ व्हावा.

**दाजी०**—म्हणून आम्हीं एकमेकांना वचन दिलं, की एकमेकांची सोयरीक घडवून आणायची.

**रत्न०**—अस्सं ! मग पुढें ?

**दाजी०**—अरे पुढें काय, यांना झाली मुलगी.

**रत्न०**—हो, ती मघांशींच झाली !

**दाजी०**—भय्यासाहेबानीं तिला उत्तम प्रकारचं शिक्षण दिलं आहे. ते जरी आफ्रिकेंत होते तरी मुलीसाठीं मुद्दाम मास्तर ठेवून इंग्रजी, संस्कृत, इतिहास इत्यादि सर्व विषयांत तिला पारंगत केलं आहे त्यांनीं.

**रत्न०**—हा शिक्षणाचा इतिहास मोठा मनोरंजक आहे खरा !

**भय्या०**—अरे दाजी, तरुण पुरुषांच्या दृष्टीनं सगळ्यांत महत्त्वाची गोष्ट तूं अजून सांगितलीच नाहींस ! रत्नकांत, माझी पोर दिसायलासुद्ध फार देखणी आहे. अगदीं चित्रासारखी आहे.

**रत्न०**—बंगाली चित्रासारखी नाहीं ना ?

**दाजी०**–ए भय्या, एखादा फोटो असला तुझ्या मुलीचा तर दाखव ना याला !

**भय्या०**–काय सांगूं दाजी तुला ! पोरगी अशी हट्टी, कीं फोटो काढायला म्हणून उभी रहात नाहीं. नाहीं तर यापूर्वीच नसता का दाखवला ?

**दाजी०**–तूं असा कसा रे बाप ? अगदीं कसा धाक नाहीं तुझ्या पोरीला ?

**भय्या०**–तुझा आपल्या मुलाला किती धाक आहे तें दिसतंच आहे !

**दाजी०**–तें जाऊं दे. तूं आपल्या मुलीचं वर्णन कर पुढं !

**भय्या०**–वर्णन काय करूं ? पोरीच्या एकेक गुणाचं वर्णन करायला लागलों तर एकेक दिवस पुरायचा नाहीं मला.

**रत्न०**–मग राहूं द्या भय्यासाहेब तें वर्णन. मला परत लोणावळ्यास जायचं आहे लगेच. तुम्हीं न सांगतां लक्षांत आलं माझ्या सगळं ! तुमची मुलगी सुंदर आहे, सुशिक्षित आहे, विनयशील आहे, सुग्रण आहे, सगळं समजलों मी !

**दाजी०**–अरे ! अन् तिचं नांव ऐकलं नाहींस अजून ?

**रत्न०**–हो खरंच कीं ! सांगा, सांगा !

**भय्या०**–तिचं नांव रंभा.

**रत्न०**–ओहो, रंभा ! मला जर नुसत्या नांवाशीं लग्न करायचं असतं कीं नाहीं, तर या घटकेला कबूल झालों असतों लग्नाला. पण काय करावं ? माझी कांहीं लग्नाला तयारी नाहीं.

**भय्या०**–झालं दाजी, चांगली ठेवलीन् तुझ्या मुलानं तुझी शोभा !

**दाजी०**–अरे थांबरे, माझी खात्री आहे, कीं तो माझं एकेल. हें बघ रतन, मी या भय्याला वचन देऊन चुकलों आहें, कीं त्याच्या मुलीला मी सून करून घेईन.

**रत्न०**–पण हें वचन देतांना माझा सल्ला नव्हता घेतलांत तुम्हीं.

**दाजी०**—अरे, त्या वेळेस तुझी मुंजसुद्धां झाली नव्हती.

**रत्न०**—हा कांहीं माझा दोष नाहीं. नशीब माझं, कीं भय्या-साहेबांना नातवंडं किती होतील याचंसुद्धां वचन देऊन ठेवलं नाहींत !

**भय्या०**—वा दाजी ! काय मुलगा मर्यादा ठेवतोय तुझी !

**दाजी०**—माझ्या मुलाबद्दल उगीच वाईट बोलूं नकोस. तुझी मुलगी काय ऐकते आहे तुझं ? फोटोसुद्धां काढून घेत नाहीं. मग लग्न करून घ्यायची गोष्ट तर दूरच ! एक मुस्कुटांत दिली असती मी माझी मुलगी असती तर !

**भय्या०**—मुलगी नाहीं पण मुलगा आहे कीं ! अन् समोरच बसलाहे !

**दाजी०**—अरे, मुलाची गोष्ट निराळी. रतन, हें बघ, या लग्नाला तुला संमति दिलीच पाहिजे. एक तर माझा शब्द गुंतला आहे—

**रत्न०**—म्हणून माझी मान गुंतवायला मीं तयार व्हावं हा कुठला न्याय ?

**दाजी०**—शिवाय भय्याजवळ निदानीला लाखाची माया आहे.

**रत्न०**-मायाच ती ! मला काय करायची आहे ?

**दाजी०**—अन् शिवाय, भय्या सांगतो त्यावरून अशी दुसरी फक्कड मुलगी मिळायची नाहीं तुला.

**रत्न०**—पण अगदीं रंभा असली तरी मला नको त्याला काय इलाज ?

**दाजी०**—नको म्हणजे काय रे ? कां नको ?

**रत्न०**—तुम्हीं ठरवलीत म्हणून नको. बापानं ठरवलेल्या मुलीशीं ती कितीही वाईट असली तरी लग्न करायचं ही दुष्ट परंपरा मोडायसाठीं आम्हीं मुलांनीं आतां असंच ठरवलं पाहिजे, कीं बापानं ठरवलेली मुलगी कितीही चांगली असली तरी केवळ ती बापानं ठरवली म्हणूनच तिच्याशीं लग्न करायचं नाहीं !

**भय्या०**-अरे दाजी, या दोघां पोरांनीं तींच तींच वाक्यं पाठ केलीं आहेत कीं काय तरी ? ( खिशांतील पत्र काढून ) हें पाहिलंस ?

माझ्या पोरीनंसुद्धां नेमकं हेंच वाक्य लिहिलं आहे. आफ्रिकेहून परत आलों, आणखी रंभाच्या मावशीनं आग्रह केला म्हणून तिला मुंबईस तिच्यापाशीं महिना पंधरा दिवसांसाठीं ठेवून इकडे आलों. म्हटलं रंभाला मुंबई पहायला मिळेल. इथें आल्यावर तुझी संमति घेतली अन् पोरीला दहा पत्रं लिहिलीं, तुझं लग्न ठरलं आहे लवकर ये म्हणून. पण तिचं प्रत्येक पत्रांत उत्तर एकच, कीं अगदीं कुबेराचा मुलगा असला तरी तुम्हीं ठरवलांत एवढ्याचसाठीं तो मला नको. या परवांच्या पत्रांत-सुद्धां हेंच लिहिलं आहे तिनं.

**रत्न०**—काय म्हणतां भय्यासाहेब, तुमची मुलगी इतकी पाणीदार आहे ? मला ती फार आवडते.

**दाजी०**—पाहिलंस भय्या, ! म्हटलं नाहीं अखेर माझा मुलगा तयार होईल लग्नाला ? रतन, तुला रंभा आवडली हें पाहून मला फार फार आनंद झाला.

**भय्या०**—मग दाजी, केव्हांचा धरायचा मुहूर्त ? बोल रतन, आणखी किती दिवस आहे तुला सुटी ?

**रत्न०**—तुम्हीं दोघांनीं हें काय आरंभलं आहे ? कसलं लग्न अन् कसला मुहूर्त ? मी कधीं कबूल झालों लग्नाला ?

**दाजी०**—हें रे काय ? आत्तांच म्हणालास ना रंभा आवडली म्हणून ?

**रत्न०**—अहो ती माझ्याशीं लग्न करायचं साफ नाकारते यासाठीं मला ती आवडली ! तिचं माझं लग्न होणं शक्य नाहीं. येवढ्याचसाठीं तुम्हीं मला बोलावलं होतं ना तार करून ? मिळालं माझं उत्तर तुम्हांला ? जातों मी, मला तडक परत गेलं पाहिजे लोणावळ्याला. तिथें आमचे सगळे विद्यार्थीमित्र जमले आहेत अन् आमचा अभ्यास चालला आहे जोरजोरांत ! ( उठून कपडे घालतो. ) व्यर्थ आणलांत कीं नाहीं व्यत्यय माझ्या अभ्यासांत ? आतां यंदा नापास झालों तर बोलूं देणार नाहीं ! ( जाऊं लागतो. )

**दाजी०**—अरे तें बोलूं देऊं नकोस, पण लग्नाचं तरी बोलूं देशील ?

**रत्न०**—छे, छे ! तें मुळींच बोलूं नका. यांच्या रंभेशीं मी लग्न करणं शक्य नाहीं.

**दाजी०**—अरे पण—

**रत्न०**—छेः ! कालत्रयींही शक्य नाहीं. जातों मी. ( जातो. )

( दोघे म्हातारे रत्नकांत जातो तिकडे कांहीं वेळ आश्चर्यानें पहात राहतात व नंतर एकमेकांकडे पहातात. )

**भय्या०**—काय दाजी ! काय अफाट मुलगा तुझा !

**दाजी०**—काय भय्या ! काय अफाट मुलगी तुझी !

**भय्या०**—सारांश काय, या पोरांचीं लग्नं जुळवायचीं कशी हा मोठा प्रश्न आहे.

**दाजी०**—मरूं दे तो प्रश्न ! आपण पुन्हां एकदां दूध पिऊं या. अरे हैबती, एक चरवी भरून दूध आण बरं !

( आंतून हैबती ओरडतो, "जी धनी, आणतों आणतों !" )

**पडदा.**

## प्रवेश २ रा.

[ धीरेंद्र नाटककाराचा बंगला. ]

**धीरेंद्र०**–( प्रवेश करून ) अरे सोन्या, ए सोन्या. कुठे गेला गद्धा कुणास ठाऊक ? ए सोन्या—

**सोन्या०**–( धांवत येऊन ) आलों आलों मालक.

**धीरेंद्र०**–( हलक्या आवाजांत ) गद्धया, मी मालक नाहीं तुझा; विसरलास वाटतं ? माझं नांव पंडितराव.

**सोन्या०**–मालक, कंटाळलों या नाटकाला. पुरे करा आतां.

**धीरेंद्र०**–अरे चूप ! पाहुण्यांच्यापैकीं कुणी ऐकेल तुझं बोलणं !

**सोन्या०**–हा तोंड दाबून बुक्क्यांचा मार सोसवत नाहीं आतां !

**धीरेंद्र०**–ती राहूं दे तुझी बडबड. आधीं धांवत जा अन् चार पौंड बर्फ घेऊन ये.

**सोन्या०**–सकाळपासून चौथ्यांदा धाडतां आहांत चार पौंड बर्फ आणायला. येवढ्या बर्फात चार शेर आईसक्रीम तयार झालं असतं. करतां आहांत तरी काय इतक्या बर्फाचं ?

**धीरेंद्र०**–तुला काय सांगूं कपाळ ? रत्नकांत इथून निघून गेल्यापासून वीणाबाईचं कपाळ भयंकर दुखायला लागलं आहे. अन् कितीही बर्फ ठेवला तरी उतरतच नाहीं तिचं कपाळ ! असं विलक्षण प्रेम पाहिलं नव्हतं बुवा कुठें ! सकाळीं चहा तरी घेतलान् कां रे तिनं ?

**सोन्या०**–छे, चहा नाहीं, कॉफी नाहीं, कांहीं नाहीं. फक्त एक मोठा ग्लास भरून मुसुंब्याचा रस घेतला. अन् मला सारख्या म्हणायला लागल्या, धीरेंद्र कुठें गेले आहेत तें मला सांग.

**धीरेंद्र०**–मग मूर्खा तूं सांगून टाकलंस कीं काय कीं तो आपल्या बापाकडे गेला आहे म्हणून ?

**सोन्या०**–छे छे, माझ्याकडून अशी चूक होईल काय ? तुम्हीं पद्मावाईना थाप दिलीत ती मीं ऐकली होती; अन् मीही वीणाबाईनां

सांगितलं, कीं धीरेंद्राना पुण्याच्या नाटक कंपनीकडून तार आली तिकडे त्यांना जावं लागलं आहे.

**धीरेंद्र०**—शाबास सोन्या ! बरं धांव बर्फ आण पाहूं !

**सोन्या०**—( दारापर्यंत जाऊन पुन्हां परत येतो ) असं करूं का मालक—अं...म्हटलं पंडितराव ? चार पौंडांच्या ऐवजीं एकदम मण-भरच आणूं का बर्फ ? कारण पाहुण्याबाईंची कपाळदुखी कांहीं लवकर उतरायची नाहीं, अन् मला पुन्हां किती वेळ बर्फ आणायला जावं लागेल—

**धीरेंद्र०**—जा जा. शहाणपणा करूं नकोस. चार पौंड घेऊन ये बर्फ.—( सोन्या जातो. ) ( स्वगत ) हा रतन आतां घरून लवकर परत आला नाहीं तर काय काय घोंटाळे होणार आहेत कुणास ठाऊक! पद्माला वाटतंय वीणा धीरेंद्राची लांबची बहीण आहे, अन् वीणालाही पद्माबद्दल तेंच वाटतंय. दोघींचा हा भ्रम रतन येईपर्यंत कायम टिकला म्हणजे मिळवली. ह्यानं जर यायला फार उशीर केला अन् तेवढ्यांत वीणा आणखी पद्मा एकमेकींना भेटल्या—( मोटारचा आवाज होतो. ) नाहीं, पण हा रतनच आला वाटतं.

**रत्न०**—( प्रवेश करून ) कायरे बाबा, राज्याची व्यवस्था ठीक आहे ना ?

**धीरेंद्र०**—एकाद्या राजासारखा पळून गेलास तेव्हां प्रश्न करतो आहेस तें ठीकच आहे. पण बाबा हें औटघटकेचं राज्य संपव आतां. मला नको जीव झाला आहे.

**रत्न०**—( हंसून ) कां रे, इतका कां त्रासलास ?

**धीरेंद्र०**—त्रासूं नाहीं तर काय करूं ? तुझी वीणा, ती पद्मा, अन् ते म्हातारबुवा डॉ० गुणे पांच पांच मिनिटांनीं मला विचारताहेत, कीं नाटककार गेले आहेत तरी कुठें, अन् यायचे आहेत तरी केव्हां. पदोपदी त्यांच्याशी खोटं बोलतां बोलतां मला आतां भीति वाटायला लागली आहे, कीं मला आतां जन्मांत कधीं खरं बोलतां येईल कीं नाहीं कुणास ठाऊक ! आणखी पद्माशीं अन् तिच्या बापाशीं वीणाची गांठ पडूं द्यायची नाहीं यासाठीं युक्त्या करतां करतां तर माझा जीव रंजीस आला बुवा. ही व्यवस्था—व्यवस्था

कसली अव्यवस्था—अखेर कशी उलगडायची आहे मला कांहीं कळत नाहीं. त्यांतल्या त्यांत एवढीच समाधानाची गोष्ट, कीं वीणाची पद्मा किंवा तिचा बाप यांच्याशीं गांठ पडणं आपोआपच अशक्य होऊन बसलं आहे.

**रत्न**०—हो कां ? तें कसं रे ?

**धीरेंद्र**०—तूं गेल्यापासून तुझ्या राज्यांतली राणी आपल्या खोलींत जी अंथरुणावर पडली आहे—

**रत्न**०—म्हणजे ? वीणा आजारी पडली आहे कीं काय ? साधा ताप, कां मलेरिया, कां नवज्वर ? बोल लवकर—

**धीरेंद्र**०—नाहीं नाहीं, विरहज्वर बरं बाबा ! तूं गेल्यापासून कपाळ-शूळ उठला आहे तिचा. अन्न नाहीं, पाणी नाहीं, फक्त अच्छेर मुसुंब्याचा रस पिते आहे घटके घटकेनं.

**रत्न**०—हा चांडाळा ! अन् तूं तिच्याजवळ बसायचं सोडून इकडे चैनींत हिंडतो आहेस काय ?

**धीरेंद्र**०—आतां तूं बैस कीं तिच्याजवळ जाऊन.

( तितक्यांत सोन्या बर्फ घेऊन येतो. )

**रत्न**०—हा चाललोंच मी तिच्या खोलींत.

**धीरेंद्र**०—हं, जा जा. अन् हें बघ, हा बर्फ आणला आहे सोन्यानं तो ठेव तिच्या कपाळावर. जा रे सोन्या त्याच्याबरोबर.

**रत्न**०—सोन्या कशाला यायला हवा आहे माझ्या मागोमाग ? गाढवच आहेस तूं. बर्फ ठेवायच्या वेळेस मी एकटाच पाहिजे तिच्या-जवळ. त्याशिवाय कां तिचं डोकं उतरणार आहे ? दे रे सोन्या बर्फ इकडे. ( जातो. )

( सोन्याही जातो. दुसऱ्या बाजूनें डॉ. गुणे प्रवेश करतात. )

**धीरेंद्र**०—काय डॉक्टरसाहेब, दुपारची वामकुक्षी झाली ठीक ?

**डॉक्टर**०—हो हो. माझी झोंपेबद्दल कधींही तक्रार नसते. कुठेंही डोळे मिटले, कीं हमखास झोंप लागावी अशी संवयच केली आहे मी.

**धीरेंद्र**०—हो कां ? मोठे भाग्यवान आहांत आपण.

**डॉक्टर०**—यांत भाग्याचा काय प्रश्न आहे? अहो, प्रॅक्टिस करावी लागते प्रॅक्टिस!

**धीरेंद्र०**—म्हणजे आपण मेडिकल प्रॅक्टिसच्या ऐवजीं हीच प्रॅक्टिस करतां वाटतं?

**डॉक्टर०**—हो, तुमचा तर्क कांहीं अगदींच खोटा नाहीं. त्याचं असं आहे, आतांशा माझी प्रॅक्टिस चांगली आहे, पण पहिल्या पहिल्यांदा काय व्हायचं, एक रोगी येऊन गेला कीं दुसरा यायला कधीं सबंध दिवसच्या दिवस वाट पहावी लागायची. मग वेळ जायचा फुकट. त्याच वेळेस मी 'पुरुषार्थदीपिका' मासिकांत वाचलं, कीं माणसानं वेळ फुकट घालवूं नये. निदान फुरसत सांपडली, कीं आत्मविचार करावा. मी तसं करूं लागलों. आणखी आत्म्याचा विचार करूं लागतांच डोळे मिटून झोंप यायला लागली. झालं, सांपडली मला झोंपेची गुरुकिल्ली! आतां माझं झोंपेचं प्रॅक्टिस इतकं वाढलं आहे, कीं परवां मुंबईस महात्मा गांधींची मिरवणूक निघाली होती तेव्हां तर मिरवणुकींत चालतां चालतां तब्बल दोन तास झोंप घेतली मीं! देशकार्यही झालं, झोंपही मिळाली!

**धीरेंद्र०**—वा वा, छान! एका गोळीनं दोन पक्षी मारलेत म्हणायचे?

**डॉक्टर०**—हो, तुमच्या गोळीवरनं आठवण झाली! वीणाबाईना मीं दिलेल्या त्या गोळ्या दिल्यात कीं नाहीं?

**धीरेंद्र०**—छे हो! त्या कांहीं केल्या तुमच्या त्या गोळ्या घेत नाहींत.

**डॉक्टर०**—होय? चला; मीच तुमच्याबरोबर येतों त्यांच्याकडे. त्या माझं खास ऐकतील. रोग्याला गोळ्या कशा घालायच्या तें डॉक्टर-वांचून इतरांना कळत नाहीं. चला पाहूं. हं चला चला.

**धीरेंद्र०**—नको नको, डॉक्टर तुम्ही कशाला तसदी घेतां?

**डॉक्टर०**—अहो रोगी तपासायचा त्यांत तसदी कसली? मला कळतच नाहीं तुम्ही वीणाबाईची तब्येत मला कां पाहूं देत नाहीं तें. सकाळपासून मी दहा वेळां म्हटलं कीं मला वीणाबाईची गांठ घेऊं द्या. पण मी पहातों आहें तुम्ही सारखं मला दूर दूर ठेवतां आहांत. पद्मालाही तुम्हीं जाऊं देत नाहीं तिच्याकडे. हें आहे तरी काय गौडबंगाल?

**धीरेंद्र**–अहो डॉक्टर, गौडबंगाल कसलं आलं आहे त्यांत? वीणाबाईंचा स्वभाव आहे विचित्र. त्या कोणाला केव्हां काय दुरुत्तर करतील त्याचा नियम नाहीं. तुम्ही आलां आहांत नाटककारांचे सन्माननीय पाहुणे म्हणून. सहज बोलण्याचालण्यांत वीणाबाईंनीं तुमचा कांहीं अपमान केला म्हणजे? मग धीरेंद्रांना किती वाईट वाटेल बरं? म्हणून त्यांनीं मला बजावलं आहे शक्य तितक्या तुमच्या आणि वीणाबाईंच्या गांठीभेटीच पडूं देऊं नकोस म्हणून.

**डॉक्टर**०–असं काय? तरी मी मनाशीं आश्चर्य करीत होतों, कीं तुम्ही शक्य तितकं आमच्या पद्माला स्वतःच्याच संगतींत कां ठेवतां? काल रात्रीं तर तुम्हीं तिला घेऊन चांदण्यांत फिरायला गेलां होतांत! पाहिलं मी. खरं ना?

**धीरेंद्र**०–आपण पाहिलंत? मला वाटलं नव्हतं!

**डॉक्टर**०–हंः हंः! अहो, म्हातारपणीं डोळे अधू झाले तरी असल्या प्रकारांत फार सूक्ष्म नजर असते आम्हां म्हाताऱ्यांची! अन् तुम्ही पद्माला घेऊन गेलांत यांत कांहीं वावगं केलंत असं नाहीं मी म्हणत.

**धीरेंद्र**०–छे छे! वावग्याची शंका तर सोडूनच द्या. कारण, पद्मा अखेर नाटककारांचीच बायको होणार हें मी क्षणभरसुद्धां विसरत नाहीं. स्वतः धीरेंद्रांचा माझ्यावर जितका विश्वास आहे तितका जगांत कुणाचा कुणावरच नसेल. तेव्हां पद्माबाईंना एकटं एकटं वाटूं नये म्हणून घेऊन गेलों होतों त्यांना फिरायला.

**डॉक्टर**०–बरं केलंत, बरं केलंत! छान केलंत अगदीं! कंटाळलीच होती ती काल दिवसभर. तुमचे धीरेंद्र बसले आपल्या खोलींत काल सबंध दिवसभर वीणाताईंना घेऊन. त्यामुळं पद्माचा वेळ जाईना. दहादां तक्रार केलीन् तिनं माझ्याजवळ. मलाही धीरेंद्राचं करणं वावगं दिसलं, पण मी काय बोलणार? गोष्टीवरून गोष्ट निघाली म्हणून तुम्हांला मात्र मी विचारतों, तुमच्या धीरेंद्राचं अन् वीणाताईचं हें वागणं जरासं वावगंच नाहीं का दिसायला?

**धीरेंद्र**०–हें वागणं म्हणजे? मी नाहीं समजलों डॉक्टर.

**डॉक्टर॰**—अहो, एका खोलींत अगदीं एकांतांत असायचं चोवीस तास ?

**धीरेंद्र॰**—अहो डॉक्टर, तीं बहीणभाऊ आहेत.

**डॉक्टर॰**—म्हणजे तर जास्तीच वावगं. मला तर अशी शंका आहे कीं काल रात्रभरसुद्धां तीं दोघं एका खोलींत होतीं.

**धीरेंद्र॰**—अहो डॉक्टर, पुन्हां तुम्ही विसरतां आहांत तीं दोघं बहीणभाऊ आहेत.

**डॉक्टर॰**—अहो पण चांगलीं तरणीं ताठीं आहेत ना ? आम्हांला तरी हें भारी वाईट दिसतं बुवा ! अहो मनूनं स्पष्ट सांगितलं आहे, कीं तारुण्य प्राप्त झाल्यावर स्त्रीनं मित्राशीं, भावाशीं, येवढंच काय प्रत्यक्ष पित्याशींसुद्धां एकांतांत बोलत राहूं नये. मग रात्रीं राहण्याची गोष्ट तर दूरच. मनूचं वचन आहे बरं महाराजा !

**धीरेंद्र॰**—अहो पण तो जुना मनु आतां राहिला नाहीं. धडधडीत विसावं शतक आहे हें ! तुम्ही कां व्यर्थ वीणाबाईबद्दल वाईट ग्रह करून घेतां ?

**डॉक्टर॰**—वाईट ग्रह नाहीं बुवा. मला तर तिची अगदीं करुणा येते आहे तिचं डोकं दुखतं आहे हें कळल्यापासून. माझं ऐका. मला घेऊन चला तिच्याकडे. एका मिनिटांत उतरवतों तिचं डोकं ! बघा तरी !

**धीरेंद्र॰**—नको नको, डॉक्टर. तिचं डोकं उतरवायचं औषध घेऊन मांत्रिक मघाशींच आला आहे.

**डॉक्टर॰**—म्हणजे कोण म्हणतां ?

**धीरेंद्र॰**—धीरेंद्र !

**डॉक्टर॰**—असं कां ? आले कां नाटककार ? केव्हां आले ?

**धीरेंद्र॰**—पुष्कळ वेळ झाला. एव्हांना वीणाबाईचं डोकं खास राहिलं असेल !

**डॉक्टर॰**—बरं झालं, बरं झालं. आतां पंडितराव, असं करा कीं कांहीं तरी युक्ति काढून धीरेंद्रांना दूर करा वीणाबाईपासून, अन् आमच्या

पद्माला थोडासा वेळ मिळूं द्या त्यांच्याशीं बोलायला. ही पद्मा आलीच. (पद्मा प्रवेश करते.) काय ग पोरी? अशी संतापानं लाल झालेली कां दिसतेस? अन् अगदीं रडायच्या घाईला आली आहेस कीं!

**पद्मा०**–(हुंदके देऊन) बाबा! बाबा! आतां या घरांत मला क्षणभरसुद्धां रहायचं नाहीं! चला, आपण परत जाऊं मुंबईला.

**डॉक्टर०**–म्हणजे? अग, झालं तरी काय? तुझं लग्न जुळवायसाठीं आपण इथें आलों—

**पद्मा०**–लग्न? प्राण गेला तरी नाटककाराशीं नाहीं मी आतां लग्न करायची!

**धीरेंद्र०**–हं पद्माबाई, बेतानं प्रतिज्ञा करा.

**पद्मा०**–बेतानं काय म्हणून? नाहींच करणार नाटककाराशीं लग्न. नाटककार म्हटला कीं साऱ्या मुलखाचा लबाड!

**डॉक्टर०**–अग, काय हें? सबंध जातीची एकदम बदनामी?

**पद्मा०**–कां नाहीं? भाताची परीक्षा शितावरून होते. (धीरेंद्राकडे वळून) तुमचे हे धीरेंद्र असे असतील अशी नव्हती ग बाई कल्पना! मला पहायला म्हणून बोलावली, अन् ती वीणा कां सतार कोण आहे, तिच्याशीं वाटेल ते चाळे चालले आहेत!

**धीरेंद्र०**–अहो पद्माबाई, त्यांचं बहीणभावाचं नातं आहे.

**पद्मा०**–चुलीत घाला हो तें नातं! मला नका सांगूं. बहीणभाऊ असे रात्रंदिवस एका खोलींत बसून फिदीफिदी हंसत नाहींत खिदळत नाहींत, रात्रींसुद्धां एकत्र रहात नाहींत!–

**डॉक्टर०**–हां हां पद्मा—

**पद्मा०**–भाऊ चार घटका गांवाला गेला म्हणून बहिणीचं असं डोकं उठत नाहीं! अन् डोकं उतरायसाठीं भाऊ बहिणीला छातीजवळ धरीत नाहीं!

**डॉक्टर०**–पद्मे, काय सांगतेस तूं? खरं? ऐकलंत पंडितराव? पद्मा, खरं कां ग?

**पद्मा०**—बाबा, प्रत्यक्ष मीं आपल्या डोळ्यांनीं पाहिलं बरं आत्तां. दाराच्या फटींतनं पाहिलं तर ती वीणा अन् ते नाटककार एकमेकाला मिठ्या—छे छे ! माझ्याच्यानं बोलवतसुद्धां नाहीं ग बाई पुढचं ! अहो पंडितराव, तुम्हाला या नाटक्याचं चरित्र माहित होतं तर तुम्हीं कां हो नाहीं मला काल इशारत दिलीत ? ( रडूं लागते. )

**धीरेंद्र०**—( जवळ जाऊन ) उगा, उगा पद्माबाई ! मी सगळं कांहीं दुरुस्त करीन हो. तुम्ही निश्चिंत रहा. मी तुम्हांला ग्वाही देतों कीं धीरेंद्र अगदीं सच्चरित्र मनुष्य आहे, अन् तो अखेर तुमच्याशींच लग्न करील. तुमचा कांहीं तरी गैरसमज झालेला दिसतो.

**पद्मा०**—गैरसमज ? अहो, प्रत्यक्ष या दोन डोळ्यांनीं पाहिलं ना मीं ?

**धीरेंद्र०**—अहो पद्माबाई, पुष्कळदां दिसतं तसं नसतं !

**पद्मा०**—मला नका हो सांगूं हें ब्रह्मज्ञान. माझी धडधडीत फसवणूक केली आहे या नाटककारांनीं. मला पाह्यचं राहिलं बाजूलाच अन् यांचे हे चटोर चाळे मीच पाहूं होय ? एका सुशील कुमारिकेचा हा धडधडीत अपमान आहे ! भेटूं देत तर खरे ते धीरेंद्र समोरासमोर म्हणजे विचारतें त्यांना—

**रत्न०**—( प्रवेश करून ) काय, मला काय विचारायचं आहे ? अन् त्यासाठीं येवढी गर्जना काय म्हणून ? काय रे पंडितराव, या अशा इतक्या संतापल्या आहेत कशासाठीं ?

**धीरेंद्र०**—त्यांचा कांहीं तरी गैरसमज झाला आहे तुमच्याबद्दल अन् म्हणताहेत आतां क्षणभर इथें राहणार नाहीं !

**रत्न०**—वा वा पद्माबाई ! इथें रहाणार नाहीं म्हणजे ? तुम्ही कोणत्या हेतूनं आलांत त्याचं विस्मरण पडलं वाटतं तुम्हाला ?

**पद्मा०**—मला नाहीं, पण तुम्हांला पडलं आहे ना ? तुमच्या कपटाचा मला आतां तिरस्कार आला आहे, समजलांत ? लबाड, कपटी, सोंगाडे !

**रत्न०**—( धीरेंद्रास एकीकडे ) काय रे मित्रा, सारंच बेंड फुटलं कीं काय ? किल्ला पडला ?

**धीरेंद्र०**–( रत्नकांतास एकीकडे ) पडला नाहीं, पण शत्रनं वेढा जबरदस्त दिला आहे. हुशारीनं लढलं पाहिजे. तुझ्या अन् वीणेच्या खऱ्या नात्याची शंका आली आहे या पोरीला, अन् ती संतापून मुंबईस परत जायला निघाली आहे बापाबरोबर–

**रत्न०**–( एकीकडे ) मग सुंठीवांचून खोकला गेला कीं ! जाऊं दे–

**धीरेंद्र०**–( एकीकडे ) शहाणा आहेस ! मी काय करूं ती गेल्या-वर ? रतन, वाटेल तें करून पद्माची समजूत घालून तिला इथें ठेवून घेतलं पाहिजे तुला.

**रत्न०**–( एकीकडे ) अरे, होय कीं ! विसरलोंच होतों मी ! पण तूं फिकीर करूं नकोस. हिची समजूत घालतों मी. तूं त्या म्हातारबुवांना घेऊन बाजूला हो पाहूं जरा.

**पद्मा०**–अहो नाटककार, त्यांच्याशीं कशाला कुजबुजतां ?

**रत्न०**–तुमच्याशीं कुजबुजायला माझी तयारी आहे. पण तुम्हीं विनाकारण रुसून बसलां आहांत माझ्यावर !

**पद्मा०**–विनाकारण ? मनाची नसली तरी जनाची तरी लाज ठेवली आहांत कां तुम्हीं ?

**डॉक्टर०**–हां हां, पद्मे, असं मर्यादा सोडून बोलणं बरं नव्हे.

**धीरेंद्र०**–डॉक्टरसाहेब, चला आपण मुळीं आंतच जाऊं. तरु-णांच्या अनुरागाचे अन् रागाचे देखावे तिसऱ्यांनीं पाहूं नयेत.

**डॉक्टर०**–अहो पण ही—

**धीरेंद्र०**–ती सुखरूप आहे हो. चला—

[ त्यांना ओढून नेतो. ते दोघे गेल्यावर रत्नकांत पद्माकडे वळून पहातो, व हंसून तिला हंसविण्याचा प्रयत्न करतो. ]

**पद्मा०**–( रागीट मुद्रा करून ) लबाड, कपटी, सोंगाडे !

**रत्न०**–पण हा आहेर कशासाठीं ? मीं काय कपट केलं तुमच्याशीं ?

**पद्मा०**–छे छे, कांहीं कपट केलं नाहीं हो ! ती घरांत असतांना तरी मला बोलवायचं नव्हतंत !

**रत्न०**—ती ? ती कोण ? वीणा होय ? तिचा मत्सर तुला वाटतो ? ( मोठ्यानें हंसून ) आतां मात्र कमाल झाली. तुम्हां बायकांच्या मत्सरी स्वभावाची. अग, वीणा माझी लांबची बहीण आहे.

**पद्मा०**—लांबची बहीण आहे तर इतकी सारखी जवळ कशाला हवी ? अन् काय हो, मघाशीं खोलींत तुमचं दोघांचं जें चाललं होतं तें मीं पाहिलं असलं तरी तुमची थाप पचेल असं वाटतं होय तुम्हांला ?

**रत्न०**—म्हणजे दाराच्या फटींतून चोरून पाह्यची संवय आहे तर तुला ! शाबास !

**पद्मा०**—विषय बदलूं नका. काय चाललं होतं तुमचं दोघांचं ? एकमेकांचे हात हातांत घेणं, डोकं छातीवर ठेवणं हीं सगळीं बहिण-भावाच्याच नात्याचीं लक्षणं वाटतं ?

**रत्न०**—( मोठ्यानें हंसूं लागतो. )

**पद्मा०**—बोला कीं ! ( तो हंसतो, ती अधिकच चिडते. ) बोला कीं आतां !

**रत्न०**—(हंसून) फसलं रे फसलं एक माणूस !

**पद्मा०**—म्हणजे ? मी फसलें ?

**रत्न०**—नाहीं तर काय ? आतां आलं माझ्या लक्षांत तूं येवढी कां पिसाळलीस ती. पण तूं अशी फसशील असं नव्हतं वाटलं मला.

**पद्मा०**—म्हणजे मीं पाहिलं तें खोटंच होय ? तुम्ही अन् वीणा खोलींत नव्हतां ?

**रत्न०**—होतों कीं !

**पद्मा०**—तिचे हात तुमच्या हातांत नव्हते ?

**रत्न०**—होते कीं !

**पद्मा०**—तिचं डोकं तुमच्या छातीवर नव्हतं ?

**रत्न०**—नाहीं कोण म्हणतो ?

**पद्मा०**—अन् तुम्हीं वाकून तिचं—बाई, बाई, मला विचारायला-सुद्धां लाज वाटते. अहो, इतकं सगळं कबूल करतां अन् खुशाल सांगतां ती तुमची बहीण आहे म्हणून ?

**रत्न०**—हो बहीणच आहे.

**पद्मा०**—बहीण आहे ? बहीणीशीं असे प्रेमाचे चाळे करीत होतां ?

**रत्न०**—( मोठ्यानें हंसून ) मग एक माणूस फसलं म्हणतों तें काय तर ?

**पद्मा०**—मी फसलें ? तें कसं बाई ?

**रत्न०**—अग कसं काय ? मी एक बडा नाटककार आहे हें विसरूं नकोस !

**पद्मा०**—छे छे, तुम्ही एक लफंगे नाटककार आहांत हें मी आतां जन्मांत कधीं विसरायची नाहीं ! पण नाटककार झालांत म्हणून बहिणीशीं असे प्रेमप्रकार ?

**रत्न०**—अग खुळे, तो प्रेमप्रसंग खरा कां होता ? नाटकांतला प्रवेश होता तो एक !

**पद्मा०**—म्हणजे ? मी नाहीं समजलें—

**रत्न०**—अग त्याचं असं झालं, मी एक नवं नाटक लिहितो आहे. त्याचं नांव " सैंपाघरांत ! " त्यांतल्या एका प्रवेशांत नायक आणि नायिका अगदीं खुषींत येतात.

**पद्मा०**—सैंपाघरांत ?

**रत्न०**—हो, सैंपाघरांत! प्रेमाला स्थळकाळाचं कुठं बंधन असतं का ? त्या प्रवेशांतलीं भाषणं मीं लिहून काढलीं, अन् तीं कशीं काय वठलीं हें मला पाह्यचं होतं. वीणा जवळच बसली होती. तिला म्हटलं नायिकेचीं भाषणं तूं म्हणतेस कां ? ती होय म्हणाली, अन् मग आम्हीं प्रवेश करून पाहिला. अरे अरे, काय फसलं एक माणूस ! ( हंसतो. )

**पद्मा०**—खरंच सांगतां हें ? मग तो प्रवेश आपण दोघं करूं या ना !

**रत्न०**—शीः, तो शिळा प्रवेश कशाला ? तुझ्यासाठीं निराळाच प्रवेश लिहीन मी ! एकदम नवा, फर्मास—

**पद्मा०**—असं ? मग बसा तर गडे लिहायला लवकर.

**रत्न**०–वा! नाटककार काय असा बैस म्हटलं कीं लिहायला बसतो होय? स्फूर्ति नको कां यायला?

**पद्मा**०–ती केव्हां येईल?

**रत्न**०–तूं ताळ्यावर आलीस कीं येईल हलके हलके! पण माझ्यावरचा राग सोडून हांस पाहूं आधीं. हांस!

**पद्मा**०–( हंसून, लगेच रुसव्याचा आव आणून ) पण मी नाहीं जा. मी मुंबईहून इथं आलें, पण एकदां तरी माझ्याजवळ बसलांत, कां बोललांत, कां चल फिरायला जाऊं म्हणालांत? चला गडे, आत्तां आपण दोघं फिरायला जाऊं!

**रत्न**०–( स्वगत ) आत्तां? अरे बापरे! वीणा आतां पोषाख करून येईल कीं फिरायला जायसाठीं.

**पद्मा**०–कां? आतां कां विचारांत पडलांत? तुम्हीं आत्तां मला फिरायला नेलं नाहींत तर तुम्हीं माझी फसवणूक चालवली आहे असंच मी म्हणेन. आणखी ती वीणा तुमची बहीण नसून—

**रत्न**०–अग पण हो हो, जरा हळूं बोल!

( तिच्या तोंडावर हात ठेवतो. )

**पद्मा**०–( हंसून त्याचा हात पकडते. ) मग फिरायला जायचं कबूल करा.

**रत्न**०–बरं कबूल.

**पद्मा**०–अन् कुठें जायचं फिरायला आहे कां माहीत?

**रत्न**०–कुठें?

**पद्मा**०–कान करा इकडे म्हणजे मी सांगतें!

( तो वांकतो. ती त्याच्या कानांत कांहीं सांगते. दोघे हंसतात. )

**पद्मा**०–अं?

**रत्न**०–बरं बरं. पण तूं पोषाख करून ये ना. अन् हें बघ अगदीं खूप वेळ लागला तुला तरी हरकत नाहीं. ( स्वगत ) किंबहुना लागावा अशी माझी इच्छा आहे. (उघड) पण तूं अगदीं सुंदर दिसली पाहिजेस. आपण रस्त्यानं जाऊं लागलों, कीं साऱ्या लोकांनीं म्हटलं पाहिजे, ओहो, स्वर्गांतली एखादी अप्सरा तर पृथ्वीवर अवतरली नाहीं?

**पद्मा**०–( आनंदातिशयानें ) बोला, बोला गडे आणखी असंच.

**रत्न**०–वा ! आत्तांच सारं बोलल्यावर मगला काय शिल्लक राहणार ? वेडी ! हं, जा जा, आटप पोषाख —

**पद्मा**०–पण तुम्ही खचित इथें थांबाल ना ?

**रत्न**०–वा, तर–

**पद्मा**०–वचन द्या.

[ तो वचन देतो. ती हंसत जाते. ]

**रत्न**०–आतां ही पोषाख करून यायच्या आंत वीणा आली तर ठीक, नाहीं तर–

**वीणा**०–( प्रवेश करून ) अहो नाटककार,

**रत्न**०–आलीस कां ? म्हटलं किती उशीर करतेस कुणास ठाऊक ?

**वीणा**०–खोटं. मला तर वाटतं, मला उशीर व्हावा असंच तुम्हांला वाटत असलं पाहिजे.

**रत्न**०–कशावरून ?

**वीणा**०–इथें जो प्रकार चालला होता त्यावरून ! मी दूर उभं राहून पाहिलं बरं कां सगळं ! काय चाललं होतं हो त्या पोरीशीं ?

**रत्न**०–कुठल्या पोरीशीं ? हां हां, आमची पद्मा म्हणतेस होय ?

**वीणा**०–हो. कोण आहे ती ? खरं सांगा.

**रत्न**०–अग, कितीदां सांगायचं तेंच तेंच ? ती माझी दूरची बहीण आहे.

**वीणा**०–दूरची बहीण आहे तर दूर कां नाहीं रहात ?

**रत्न**०–दूरच राहते. मुंबईस असते. चार दिवस राह्यला माझ्याकडे आली आहे.

**वीणा**०–अस्सं, आणि म्हणून तुम्ही असे चाळे करतां वाटतं ? तोंडावर हात ठेवणं, हातांत हात धरणं, अगदीं प्रेमाच्या खुषीनं हंसणं, हीं सगळीं बहीणभावाच्याच नात्याचीं लक्षणं वाटतं ?

**रत्न**–( मोठ्यानें हंसून ) फसलं रे फसलं एक माणूस !

**वीणा**०—म्हणजे ? हंसतां काय ? बोला ना. मी फसलें म्हणजे काय ? बोला ना. ती पद्मा आणखी तुम्ही आतां एकत्र नव्हतां ?

**रत्न**०—होतों.

**वीणा**०—तुम्हीं तिच्या तोंडावर हात ठेवला नव्हता ?

**रत्न**०—होता.

**वीणा**०—तिनं तुमचे हात धरले नव्हते ?

**रत्न**०—नाहीं कोण म्हणतो ?

**वीणा**०—अन् तरी ती तुमची बहीणच होय ?

**रत्न**०—(हंसून) मग एक माणूस सफाई फसलं म्हणतों तें काय ! अग तूं जे प्रकार पाहिलेस ते खरे नव्हते, खोटे होते.

**वीणा**०—असं, असं. ती पद्मा खोटी, तिचं तोंड खोटं, तिचे हात खोटे—

**रत्न**०—अग तसं नाहीं. तो नाटकांतला एक प्रवेश होता.

**वीणा**०—म्हणजे ?

**रत्न**०—त्याचं असं झालं, मी सध्यां एक नवं नाटक लिहितों आहें. त्याचं नांव 'चुलीपाशीं' ! त्यांतला एक प्रेमाचा प्रवेश—

**वीणा**०—काय, चुलीपाशीं ?

**रत्न**०—हो, त्याला काय झालं ? तर तो प्रवेश मीं लिहिला, अन् त्यांतलीं भाषण कशीं काय वठलीं तें मला पाह्यचं होतं, तेव्हां पद्माला सहज म्हटलं तूं नायिकेचीं भाषणं म्हण. ती होय म्हणाली. तेव्हां आम्हीं प्रवेश करून पाहिला.

**वीणा**०—होय ? मग मी म्हणतें गडे तीं भाषणं !

**रत्न**०—शीः, तीं शिळीं भाषणं कशाला तूं म्हणायचीं ? तुझ्यासाठीं निराळींच लिहीन मी. एकदम झकास !

**वीणा**०—मग लिहा गडे आत्तांच. फिरायला जाणं राहूं दे. तुम्हीं लिहीत बसा, अन् मी तुमच्याकडं टक लावून पहात बसतें !

**रत्न**०—छे, छे, दृष्ट लागेल तुझी मला !

**वीणा०**—असं काय गडे ? मी इथें आल्यापासून एकदांसुद्धां लिहायला बसलां नाहींत.

**रत्न०**—अग, आम्ही नाटककार मोठे लहरी. बसूं तेव्हां बसूं दहा दहा घटका, अन् नाहीं म्हणजे दहा दहा दिवस आम्हीं कागदाला टांक लावणार नाहीं ! अग, स्फूर्ति यायला पाहिजे.

**वीणा०**—मग ती केव्हां येईल गडे ?

**रत्न०**—अग, तिचा कांहीं नियम नाहीं. पण मला वाटतं, आपण फिरायला गेलों तर परत आल्यावर बहुतेक येईल ती. हं चल. चल. फिरायला येतेस ना ? किती सुंदर दिसतेस तूं या वेळेस !

**वीणा०**—पुरें झालं !

( दोघे हंसतात. तो तिचा हात धरून जाऊं लागतो तोंच दुसऱ्या बाजूनें पद्मा, डॉक्टर गुणे व धीरेंद्र प्रवेश करतात. )

**पद्मा०**—अहो धीरेंद्र ! ( बापास ) बाबा, मी यांच्याबरोबर जरा फिरायला जाऊन येतें हं ! ( रत्नकांताजवळ जाऊन ) झाला माझा पोषाख पुरा. छान दिसतें ना मी ? ( वीणेकडे पाहून ) पण हें काय ? या येणार कीं काय बरोबर ?

**वीणा०**—( रत्नकांतास ) हें काय ? वन्सं येणार आहेत कीं काय बरोबर फिरायला ? वन्सं, तुम्ही कशाला येतां ? बाहेर फार थंडी पडली आहे. तुम्ही घरींच बसा. खरंच वन्सं—

**पद्मा०**—गप बसा हो. तुमचा असा संताप येतो मला !

**वीणा०**—( पद्माजवळ जाऊन ) इश्श, इतकं संतापायला काय झालं ? वन्सं, काय झालं येवढं ? वन्सं !

**पद्मा०**—( तिला दूर लोटून ) वन्सं ? कुणाला वन्सं म्हणतेस ? कांहीं लाज ? कांहीं नात्यागोत्याची अक्कल ? तुझी वहिनी होणार ना मी ? अन् मला वन्स म्हणतेस ? अग वा ग शाहणी !

**वीणा०**—अहो अहो मंडळी, या बाईला वातबीत तर नाहीं ना झाला ? म्हणे ही माझी वहिनी होणार ! माझी वहिनी ! (मोठ्यांदा हंसते)

**डॉक्टर०**—खचित, या वीणाबाईला वात झाला. हिचं डोकं उतरायच्या ऐवजीं पुरतं फिरलं ! अहो, कुणी तरी स्मेलिंग सॉल्टची ही बाटली धरा हिच्या नाकाशीं ! नाहीं तर मीच धरतों. (वीणेजवळ जातो.)

**वीणा०**—( त्याला ढकलून ) दूर व्हा. तुमच्या लेकीच्याच नाकांत कोंबा तें स्मेलिंग सॉल्ट ! म्हणे तुझी वहिनी होणार ! मी काय धीरेंद्रांची बहीण आहे कीं काय ? वा ग शहाणी ? ( रत्नकांतास) अन् तुम्ही हें सगळं ऐकतां आहां तरी कसं ? तुमच्या बहिणीला आंवरा कीं जरा !

**पद्मा०**—कुणाला ग पुन्हां पुन्हां वन्सं वन्सं अन् बहिण बहिण म्हणतेस ? मी यांची बहीण होय ?

**वीणा०**—मग मी तरी यांची बहीण होय ?

**पद्मा०**—नाहीं तर काय ? विचार त्यांनींच सांगितलं कां नाहीं तसं तें !

**वीणा०**—शक्यच नाहीं. उलट तूं त्यांची बहीण आहेस असंच सांगितलं त्यांनीं मला !

**पद्मा०**—( रत्नकांतास ) होय कां हो ?

**डॉक्टर०**—होय कां हो ? उलट ही वीणा तुमची दूरची बहीण आहे असं नाहीं तुम्हीं आम्हांला सांगितलंत ?

**वीणा०**—( रत्नकांताचा कोट पकडून ) होय कां हो ? असं सांगितलंत तुम्हीं ? बोला ना !

**पद्मा०**—( त्याच्या कोटाची दुसरी बाजू धरून ) बोला ना. आतां कां दांतखिळी बसली ?

**रत्न०**—पंडितराव, मित्रा धांव !

**धीरेंद्र०**—आतां धीरेंद्र, तुम्हींच सांगा काय सांगायचं आहे तें !

**डॉक्टर०**—धीरेंद्र, बोला बोला. तुमची ठकबाजी आतां चांगलीच उघडकीला आली आहे. काय खरा प्रकार आहे तो सांगून टाका.

**रत्न०**—सांगतों हो डॉक्टर; पण आधीं आपल्या या मुलीला दूर ओढा. माझ्या कोटाची इस्त्री खराब करते आहे ती. स्त्रीपेक्षांसुद्धां इस्त्रीचं महत्त्व मला अधिक वाटतं !

**डाक्टर०**—बाळ पद्मा, सोड त्यांचा कोट. तेवढा तरी संसर्ग कशाला हवा असल्या लबाडाचा ? ( पद्मा दूर होते.) हं सांगा पाहूं धीरेंद्र आतां काय तें.

**रत्न०**—थोडक्यांत सांगतों, कीं ही वीणा माझी बहीण नाहीं. ती माझी वाङ्‌निश्चित वधू आहे.

**पद्मा०**—काय ऐकतें हें मी ? खरंच कां ?

**डॉक्टर०**—काय सांगतां हें ? खरंच कां ?

**वीणा०**—झालं कां आतां ? तोंड बघा आतां यांचीं !

**डॉक्टर०**—अहो शिष्ट नाटककार, मग बोलावलंत कशाला मला मुलीला घेऊन ? कांहीं लाज ?

**पद्मा०**—देवा देवा ! लग्न ठरायसाठीं म्हणून मी मुंबईहून इथें आलें, अन् असला सोहळा होऊन आतां परत जायचं ? साऱ्या मुंबईत छीः थू होईल माझी. मेलीं तीं गिरगांवातलीं साप्ताहिकं ! काय वाटेल तें लिहितील माझ्याबद्दल. बाबा, लग्न ठरल्यावांचून मी नाहीं परत जाणार इथनं ! मी आपली या पंडितरावांशीं लग्न करीन ! या दोन दिवसांत या लबाड नाटककाराबद्दल जितकं वाईट मत झालं माझं, तितकंच या पंडितरावांच्यावर माझं प्रेमही बसलं आहे.

**रत्न०**—मग छान झालं कीं ! आमचा पंडितराव नाहीं म्हणायचा नाहीं या गोष्टीला. काय रे पंडितराव ?

**धीरेंद्र०**—पद्माचं माझ्यावर प्रेम असेल तर मी कबूल आहें लग्नाला.

**वीणा०**—अहो पद्माबाई, या पंडितरावांना क्षय झालेला आहे हं ! आणखी स्त्रियांच्याविषयीं अगदीं अनुदार कल्पना आहेत यांच्या !

**डॉक्टर०**—खरं कीं काय ? पद्मे, कांहीं झालं तरी क्षयी नवरा करूं देणार नाहीं मी तुला. मी डॉक्टर आहें.

**पद्मा०**—अहो बाबा, या वीणेचं काय ऐकतां तुम्ही ? दुष्टाव्यानं काय वाटेल तें बरळत असली पाहिजे ती !

**वीणा०**–खोटं वाटत असेल तर विचार या धीरेंद्रांना. त्यांनींच सांगितलं मला. नाहीं कां हो ?

**पद्मा०**–होय कां हो ?

**रत्न०**–पंडितराव, मित्रा, काय रे करूं ?

**धीरेंद्र०**–घोटाळे करा आणखी !

**रत्न०**–वीणे, कांहीं कारणासाठीं तीसुद्धां एक थाप दिली होती मी. पद्माताई, या पंडितरावाची प्रकृति अगदीं निकोप आहे. तुम्हांलाही कळेलच लवकर. तुम्ही खुशाल लग्न लावा त्याच्याशीं !

**डॉक्टर०**–अहो गुरु, आतां हें तरी खरं कां ? आणखी काय काय थापा दिल्या होत्यात आम्हांला ? सांगून तरी टाका एकदां. हे पंडितराव तुमचे सेक्रेटरी आहेत हें तरी खरं कां ? कां आहे कुणी वाटचा उचल्या ?

**रत्न०**–छे छे छे ! ती शंका अगदीं घेऊं नका. बाकी सगळं खोटं, पण मी नाटककार अन् हा माझा सेक्रेटरी हें अगदीं त्रिकालाबाधित सत्य आहे !

**एक गृहस्थ०**–( प्रवेश करीत ) अहो धीरेंद्र ! धीरेंद्र !—

**रत्न०**–आं ? कोण हो तुम्ही माझ्या नांवानं खुशाल हांका मारीत बंगल्यांत शिरलांत ते ?

**धीरेंद्र०**–( स्वगत ) आतां हें मात्र बिनतोड संकट आलं ! आमच्या कल्लोळ नाटक कंपनीचा हा मालक नको त्या वेळीं कशाला प्रगट झाला ?

( आंत जातो.)

**मालक०**–( रत्नकांतास ) मी कोण विचारतां काय ? धीरेंद्रांचीं नाटकं जी कल्लोळ नाटक मंडळी करते तिचा मी मालक ! त्यांची अगदीं नोटीस आली म्हणून हप्त्याचे पैसे घेऊन आलों. तुम्ही कोण तेंच सांगा मला. मला तुम्ही नको आहांत; धीरेंद्र हवे आहेत.

**वीणा, पद्मा व डॉक्टर०**–म्हणजे ? हे धीरेंद्र नाहींत ?

**मालक**०—हे धीरेंद्र ? भागलं ! कुणीं सांगितलं तुम्हांला हे धीरेंद्र म्हणून ?

**पद्मा**०—आतां शर्थ झाली बाई या लबाड मनुष्याची ! हा सज्जन तर नाहींच, पण नाटककारसुद्धां नाहीं !

**डॉक्टर**०—अहो महाशय, आपण आहांत तरी कोण ?

**वीणा**०—( रत्नकांतास ) हें सगळं तुम्ही कसं ऐकून घेतां ?

**मालक**०—अहो धीरेंद्र, अहो धीरेंद्र, जरा आंत असलांत तर बाहेर या ना !

**धीरेंद्र**०—( प्रवेश करून ) आलों, आलों, मालक. केवढा ओरडा ? काय काम आहे ?

**मालक**०—अहो, तुमच्या हप्त्याचे पैसे आणले आहेत.

**धीरेंद्र**०—होय का ? मोठी नवलाची गोष्ट आहे म्हणायची !

**पद्मा**०—( धीरेंद्रास ) म्हणजे तुम्हीच खरे धीरेंद्र तर ?

**वीणा**०—( रत्नकांतास ) अन् तुम्ही धीरेंद्र नाहीं ?

**डॉक्टर**०—अहो, तुमचं त्रिकालाबाधित सत्यसुद्धां खोटं ठरलं कीं !

**रत्न**०—मित्रहो, खरंच सांगतों मी नाटककार नाहीं ! ( वीणेस ) लाडके, पण मी नाटककार नसलों तरीसुद्धां तूं माझ्याबरोबर लग्न करशील ना ?

**वीणा**०—मी तुमचीच आहें ! तुम्ही कोणीही असा.

[ दाजी व भय्यासाहेब प्रवेश करतात. ]

**दाजी**०—( प्रवेश करतां करतां ) आमचा रत्नकांत इथें आहे कां ? हा धीरेंद्रांचाच बंगला ना ? ( प्रवेश करून ) अरे रतन, तूं आहेसच कीं इथें! तूं अभ्यासांत गर्क होतास ना ? छान चालला आहे कीं अभ्यास ! पण तें जाऊं दे. तुझी समजूत घालायसाठीं मी आणखी भय्यासाहेब मुद्दाम मोटार करून आलों. चल बाबा, ऐक. यांच्या पोरीशीं लाव लग्न.

**रत्न**०—शक्यच नाहीं. माझं लग्न आधींच ठरलं आहे. ही माझी नियोजित वधू. हिचं नांव वीणा. ही एक नामांकित नटी आहे.

**वीणा०**–( स्वगत ) अग बाई ! दाजीसाहेब कुबेरांचे चिरंजीव रत्नकांत ते हेच कीं काय ? अन् आमचे भय्यासाहेब इथें कसे आले ? घात झाला !

**भय्या०**–( रत्नकांतास ) काय म्हणालास रत्नकांत ? ही नामांकित नटी आहे ? केव्हां झाली ही नटी ? काय ग रंभे, हें नटीचं सोंग केव्हां घेतलंस ?

**रत्न०**–म्हणजे भय्यासाहेब ? ही तुमची रंभा कीं काय ? शाबास ! ( वीणेस ) अन् काय ग, तूं तर मला सांगितलंस, कीं नामांकित नटी वीणा ती तूंच !

**वीणा०**–तुम्हीं कसं मला सांगितलंत कीं तुम्ही धीरेंद्र नाटककार म्हणून ?

**रत्न०**–मीं नाहीं सांगितलं. तूंच मला पाहिल्याबरोबर ठरवलेस धीरेंद्र. अन् मग हातांत येत चाललेलं प्रेम नाहींसं होईल या भीतीनं मीं बतावणी केली !

**वीणा०**–अन् तसंच मी वीणा हें तुम्हींच ठरवलंत मला पाहिल्या-बरोबर ! अन् तुमचं माझ्यावरचं प्रेम उडेल या भीतीनं मी वीणेचं सोंग घेतलं.

**दाजी०**–हात् कार्ट्यांनों !

**भय्या०**–काय शहाणीं पोरं आहेत ? कांहीं केल्या लग्न करणार नाहीं असं आपापल्या बापाशीं भांडणं करून शेवटीं एकमेकांच्याच गळ्यांत पडलांत !

**दाजी०**–म्हणजे शेवटीं बापांनीं ठरवलेल्या लग्नालाच कबूल झालांत दोघं !

**डॉक्टर०**–असो असो ! फार गोड फजिती आहे ही ! ( भय्या-साहेब व दाजीसाहेब यांस ) आपला माझा परिचय नाहीं. पण या तरुण मंडळीच्यावर राग करण्याऐवजीं आपण त्यांना प्रेमानं आशिर्वाद देऊं या. ही माझी मुलगी पद्मा. हे खरे खरे नाटककार धीरेंद्र. या दोघांचंही लग्न ठरलं आहे.

**दाजी**०–असं का? आनंद आहे.

**भय्या**०–जगांत जितकीं लग्नं अधिक लागतील तितका म्हाताऱ्या माणसांना अधिक आनंद होत असतो.

**धीरेंद्र**०–आतां अनायासें सर्व मंडळी एकत्र जमलां आहांत तेव्हां माझ्या या बंगल्यांत उद्यांच उरकून टाकूं दोन्ही लग्नसमारंभ!

**दाजी**–वा फक्कड!

**भय्या**०–वा उत्तम! पण बंगल्यापुढें मांडवाला मोठी जागा आहे ना?

**धीरेंद्र**०–हो हो. सोन्या, ए सोन्या!

**सोन्या**०–(धांवत येऊन) काय काय पंडितराव?

**रत्न**०–ए सोन्या, तो पंडितराव खोटे नाहीं राहिला आतां. तुझा मालक धीरेंद्र झाला तो पुन्हां.

**सोन्या**०–होय कां? संपलं का तुमचं नाटक?

**रत्न**०–हो, नाटक संपलं! अखेरी जी व्हायची ती झाली तेव्हां आतां प्रेक्षकांना उगीच कशाला बसवून ठेवायचं? पडदा पाडलाच पाहिजे.

**सोन्या**०–पण तुमच्या या नाटकाचं नांव काय? आरंभीं सांगितलं नाहींत आतां शेवटीं तरी सांगा कीं!

**रत्न**०–तें तुझा मालक सांगेल. मला नांवापुरतंसुद्धां नाटकांतलं कांहीं कळत नाहीं. बोलूनचालून मी तोतया नाटककार!

**धीरेंद्र**०–तोतया नाटककार! हेंच नांव छान आहे कीं या एकंदर नाटकाला! बस् हेंच नांव! नाटकाचं बारसं, अन् लग्नांचीं केळवणं एकदमच उरकूं आज रात्रीं! सोन्या, जंगी मेजवानीचा बेत करायचा रे रात्रीला!

**सोन्या**०–तें आपल्याकडे लागलं. हा चाललोंच मी! (जातो.)

**रिपोर्टर**०–(प्रवेश करून) मेजवानीच्या वेळेस आमची आठवण ठेवा हो.

**रत्न०**—हें कोण पात्र नाटकाच्या शेवटीं आलं ?

**रिपोर्टर०**—'दुष्काळ'चे तिसरे सहसंपादक आहोंत अस्मादिक !

**धीरेंद्र०**—तेव्हां मेजवानीच्या वासानं आलांत हें ठीकच झालं. या. Welcome.

**रिपोर्टर०**—अहो, रिपोर्टरला पंक्तीला घेणं अवश्यच असतं. त्याशिवाय 'अभिनंदनीय प्रीतिविवाह' या मथळयाखालीं वर्तमानपत्रांत तुमच्या लग्नाचीं कॉलमच्या कॉलम वर्णनं कोण करणार ?

**दाजी०**—अहो धीरेंद्र, आतां भूक फार लागली. कशाला त्या पोराशीं बोलतां ?

**धीरेंद्र०**—खरंच, आंत चला. आपण चला भय्यासाहेब. मात्र मी अन् पद्मा, आणखी रतन अन् वीणा म्हणजे रंभा जरा चांदण्यांत फिरून येतों. आपली ना नाहीं ना ?

**दाजी०**—छे छे ! आमच्या फराळाची व्यवस्था सोन्यानं केलीन् म्हणजे आमची कांहीं हरकत नाहीं. खुशाल जाऊन या तुम्ही. तरुणांनीं नाहीं चांदण्यांत फिरायला जायचं तर काय आम्ही म्हताऱ्यानीं ? नाहीं कां रे भय्या ?

**भय्या०**—तर काय ! रंभा, जा बेटा जरा सहल करून ये रतन-बरोबर !

**डॉक्टर०**—पद्मा, जा बेटा जरा पाय मोकळे करून ये धीरेंद्रांबरोबर.

[ तरुणांच्या जोड्या हातांत हात घालून जातात. रिपोर्टरही जातो. ]

**दाजी०**—काय हीं आजकालचीं कारटीं ! यांचं कौतुक करावं कीं यांच्यावर रागवावं कांहीं कळतच नाहीं ! पण जाऊं दे. भय्या, चल बाबा खाऊं थोडंसं. चला हो डॉक्टर ! अन् तूंही चल रे मुला. अरे, हा रिपोर्टर कुठें गेला ? त्या तरुण मंडळींच्या मागं गेला कीं काय गुलाबी बातम्या काढायला ?

( सगळे हंसतात. )

**पडदा.**

—समाप्त—